# कालिदास-दर्शन

डॉ. गोविन्द केशव भट
एम् ए, पीएच् डी
संस्कृत विभाग प्रमुख
एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई १

व्हीनस प्रकाशन : पुणे

भाऊ,

अकरा अनुवादाला या पुस्तकाचा
सूचा करायला घेतली त्याच दिवशी
संध्याकाळी तू गेलास सूचना न
देता कायमचा

माझा हा प्रयत्न तू पाहिलाच नाहीस
आता पाहणार नाहीस कधीच

पण तुला हे कळलं ना ? माझी तशी
श्रद्धा आहे

म्हणून हे पुस्तक तुझ्यासाठी
तुलाच

निन्दा

# निवेदन

व्हीनस प्रकाशन व्याख्यानमालेचे चौथे पुष्प आज प्रकाशित होत आहे. १९६३ मध्ये व्हीनस प्रकाशन या संस्थेचा रौप्य-महोत्सव साजरा झाला, त्या वेळी आणि त्या निमित्ताने या प्रकाशन संस्थेने असे ठरविले होते की संस्थेचा केवळ उत्सव साजरा करून न थांबता दरवर्षी एखादे ज्ञानसत्र चालवून वाङ्मयीन कार्य सातत्याने चालवीत राहावे. अर्थात या कार्याचे स्वरूप मुख्यतः व्याख्यानमालेचे असावे. या व्याख्यानाचे स्वरूप चिरस्थायी करण्याच्या दृष्टीने ती ग्रंथरूपाने प्रकाशित व्हावी हेही निश्चित झाले. ती शक्य तर आधी लिहिली जावी आणि व्याख्यानाच्या वेळीच ग्रंथरूपाने प्रकाशित व्हावीत अशीही कल्पना होती. काही ना काही अडचणींमुळे दरवर्षी तसे शक्य झाले नाही तरी त्यापुढील पुढील व्याख्यान–ग्रंथ योग्य वेळी प्रकाशित होतील अशी काळजी घेतली जाईल.

व्याख्यानमालेचे पहिले पुष्प १९६४ मध्ये श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी गुंफले होते. त्याचा विषय होता 'हिंदवी स्वराज्य आणि मोगल'. दुसरे पुष्प १९६५ मध्ये डॉ. शं. दा. पेंडसे यांनी 'वैदिक वाङ्मयातील भागवत धर्माचा विकास' या विषयावर व्याख्याने देऊन गुंफले होते.

तिसरे पुष्प १९६६ मध्ये डॉ. ना. र. देशपांडे यांनी 'भारतीय राजकारण : विकास आणि समस्या' या विषयावर व्याख्यान देऊन गुंफलेले होते.

आता हे चवथे पुष्प १९६७ मध्ये डॉ. गो. के. भट यांनी 'कालिदास दर्शन' या विषयावर गुंफलेले आहे. ते वाङ्मय-रसिकांच्या हाती देण्यास आम्हाला निरतिशय आनंद होत आहे.

रा. श्री. जोग
अध्यक्ष
व्हीनस प्रकाशन व्याख्यान समिती

## काही प्रास्ताविक :

संस्कृत कवी कालिदास ह्याजविषयी आजवर इतक्या लोकांनी आणि इतके सांगितले आहे की आता आणखी काही सांगण्याचे उरले आहे काय अशी शंका कोणास आली तर आश्चर्य वाटण्या सारखे नाही. तथापि श्रेष्ठ कवी आणि त्यात कालिदास हे नित्य-नूतनच असतात, आणि त्यांच्यासबंधी 'शेवटला शब्द' कधीच बोलला जात नाही. इकडील विद्यापीठांमधून कालिदासाचा अभ्यास होऊ लागल्यापासून कालिदासाची काव्ये आणि नाटकें यांचे अभ्या सकांच्याकरिता संपादन होऊ लागल्यास आता १०० वर्षे तरी झाली आहेत. परंतु हा अभ्यास इंग्रजीच्याद्वारे व्हावयाचा. म्हणून कालि दासवाङ्मयातील पुष्कळच भाग हा इंग्रजीमधून आपल्याकडेही प्रसिद्ध झाला. पाश्चात्यांनी आपापल्या मापानूनच त्याविषयी लिहावे हे अर्थात स्वाभाविकच होते. कालिदासाविषयी मराठीमधून झालेले लेखन किंवा त्याच्या काव्यनाटकांची झालेली मापान्तरे ही मात्र विद्यापीठीय अभ्यासकांकरिता झाली नाहीत, निदान अगदी अलीकडे पर्यंत झाली नाहीत, सामान्य रसिक वाचकांकरिता झाली आहेत ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. कालिदासाच्या मेघदूताची पधरा तरा मापान्तरे मराठीत झाली असतील. ती सारी हौसेखातर, एक अवघड काम करण्याच्या जिद्दीने झाली, शालेय वा विद्यापीठीय अभ्यासकां करिता नव्हेत. त्याच्या शाकुंतल नाटकाचीही जी पाचसहा मापान्तरे वा अनुवाद झाले असतील, तेही याच वृत्तीमधून. त्याच्या रघुवंश, कुमारसंभव या काव्यांची किंवा विक्रमोर्वशीय-मालविकाग्निमित्र या नाटकांचीही मराठीमध्ये मापान्तरे झाली आहेत. या संदर्भात कालि दासाविषयी जी चर्चा झाली, ती अर्थात मर्यादित स्वरूपाची होती.

त्या मानाने कालिदास व त्याचे समग्र वाङ्मय यांविषयी साकल्याने चर्चा करणारे ग्रंथ मराठीत थोडेच झाले आहेत. ओगले, मिराशी, अळतेकर यांची पुस्तके किंवा चिपळूणकरांच्या संस्कृत-कविपंचका-सारख्या समग्र संस्कृत काव्याविषयी चर्चा करणाऱ्या पुस्तकांतील काही प्रकरणे एवढेच या स्वरूपाचे कालिदासवाङ्मय आपल्यास उपलब्ध आहे. तेव्हा कालिदासविषयक आणखी एखादे पुस्तक झाल्यास ते मराठी वाचकांना नको होते असे नाही. प्रस्तुत पुस्तकाच्या प्रयोजनाविषयी अधिक लिहिण्याची आवश्यकता नाही.

प्रस्तुत पुस्तक हे काही मर्यादा किंवा बंधने लक्षात घेऊन निर्माण झाले आहे. हे पुस्तक व्याख्यानसंग्रहाच्या स्वरूपाचे आहे, आणि त्या व्याख्यानांची संख्या तीनच आहे. एकेक व्याख्यान दीड दीड तासाचे धरले तरी एकंदर विवेचनास पुरेसा वेळ मिळत नाही हे सांगावयास नकोच. ही व्याख्याने संस्कृतच्या विद्यार्थ्यांकरिता नसून सर्वसामान्य बहुश्रुत किंवा बहुश्रवण करू इच्छिणाऱ्या मराठी माणसा-करिता होती हेही लक्षात घेणे आवश्यक आहे. या दृष्टीनेच व्याख्याते प्रा. गो. कृ. भट यांनी त्यांची योजना केली आहे हे सहज लक्षात येईल. कालिदासविषयक एक मोठा वादबिंदू म्हणजे त्याचा कालनिर्णय होय. तथापि त्या वादामध्ये व्याख्याते शिरले नाहीत; कारण सामान्य रसिकास त्यात रस असत नाही. कालिदास केव्हा झाला या विचारापेक्षा त्याने लिहिले काय हे अर्थात त्यास महत्त्वाचे वाटते. प्रा. भट यांनी आपल्यास योग्य वाटणारा काळच गृहीत धरला आणि आपले विवेचन केले. " इ. स. तिसरे–चौथे शतक हा बहुतेक विद्वानांना मान्य असलेला काल कालिदासाचा काल म्हणून मानावयास हरकत नाही " एवढ्या एकाच वाक्यात या प्रश्नाचा ते परामर्श करितात. ( हा काल मान्य नसणारे विद्वान अजूनही आहेत. ) कालिदासकालापेक्षा त्याचे चरित्र आणि व्यक्ति-

मत्त्व त्याना अधिक महत्त्वाचे वाटते; आणि काही टवकयांर्लीकडे चरित्रापेक्षा आधार मिळत नसल्याने चरित्रापेक्षा व्यक्तिमत्त्वावरच आपले लक्ष ते अधिक केन्द्रित करतात. त्यांच्या पहिल्या व्याख्यानात व्यक्तिदर्शन, दुसऱ्यात विचारदर्शन, आणि तिसऱ्यात प्रणयदर्शन अशी योजना व दृष्टी त्यांनी ठेविली आहे आणि आपल्या व्याख्यानाचा भर याच गोष्टींवर दिला आहे हे वाचकाच्या सहज लक्षात येण्यासारखे आहे. प्रस्तुत ग्रंथाचे स्वरूप ठरण्यास त्याबाबत असलेल्या मर्यादा आणि बंधने या प्रकाराने कारण झाली आहेत.

कालिदासाचे व्यक्तिमत्त्व कळण्यास विश्वसनीय चरित्राच्या अभावी त्याचे वाङ्मय अधिक उपयोगी पडते. त्यावरून त्याच्या व्यक्तिमत्त्वाची जी प्रतिमा डॉ. भट याच्या मनासमोर उभी राहते, ती 'सपन्न, सौंदर्यासक्त, जीवनात आनंद घेणारी, खेळकर' अशी आहे. 'जीवनातील कटुता, भीषणता, कालिदासाने पाहण्याचे टाळले आहे' असेही त्याना वाटते. कदाचित त्याचे रौद्र रूप त्याच्या सपन्न जीवनामुळे वा राजाश्रयामुळे त्याच्या अनुभवास आले नसेल, किंवा त्याच्या विशिष्ट मनोवृत्तीमुळे त्यानेच या रौद्र रूपाकडे दुर्लक्ष केले असेल असेही त्याना वाटते असे दिसते. त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे मुख्य विशेष म्हणून ( १ ) विद्वत्ता आणि कल्पकता यांचा सगम, ( २ ) त्याची सौंदर्यासक्त दृष्टी, ( ३ ) त्याची निसर्गविषयक भावना, आणि ( ४ ) जीवनाकडे पाहण्याची आनदी आणि खेळकर वृत्ती याचा उल्लेख प्रा. भट यानी केला आहे. कालिदासाच्या साहित्यावरून अनुमित केलेल्या त्याच्या या व्यक्तिमत्त्वास ( यातच अनत्ययनेचे दुःख कालिदासास अनुभवाने आवळले असावे ही कल्पना' घालण्यास हरकत नसावी ) धरूनच त्याना पुढे, विशेषतः 'प्रणयदर्शन' या भागात विवेचन करावे लागते. हा इतरेतराश्रय असला तरी प्राप्त परिस्थितीत त्याच्याशिवाय गत्यतर नाही हेही तितकेच खरे आहे.

कवीच्या व्यक्तिमत्त्वात त्याच्या विचाराचा अंतर्भाव अगदी काटेकोर पाहिल्यास कदाचित होणार नाही. तरी कालिदासाचे अंतरंग समजण्यास त्याचा खास उपयोग होतो. डॉ. भट यानी आपल्या दुसऱ्या व्याख्यानात कालिदासाच्या विचाराचा परामर्श घेतलेला आहे. कालिदासकालात ब्राह्मणधर्माचे पुनरुत्थान होत होते, म्हणून यज्ञप्रधान आचारधर्माचे त्याला आकर्षण होते. आणि त्रिमूर्तीमधील शिवाविषयीचा पक्षपात त्याच्या मनात होता. पूर्वजन्म, पुनर्जन्म इत्यादींवर त्याचा विश्वास असे, राजशाही शासनाबद्दल त्याला आदर होता, चातुर्वर्ण्य आणि चतुराश्रम ही सामाजिक चौकट त्याला मान्य असे, स्त्रीचे समाजातील स्थान दुय्यम आहे इत्यादी त्याची मते असावी असे त्याचे म्हणणे आहे. एकदरीत राजकीय, सामाजिक, धार्मिक, कौटुंबिक किंबहुना शैक्षणिक वा कलाविषयक क्षेत्र असो, आहे त्याचा स्वीकार करण्याची त्याची वृत्ती होती. मात्र त्यात अगतिकता नसून आदर्शानुगामी वृत्ती होती असे त्यांचे याविषयीचे विवेचन आहे, व ते मान्य होण्यासारखे आहे मधूनच ते कालिदासाची भवभूतीशी तुलना करितात, आणि भवभूतीची बेहोशी, स्वतंत्र वृत्ती, अतिरेक करण्याचा स्वभाव यांचा उल्लेख, बहुधा अनुकूलतेने करितात. एक ( कालिदास ) हा क्लासिसिस्ट, आणि दुसरा ( भवभूती ) हा रोमँटिक असल्याने त्यांच्यामध्ये असणारा भेद अर्थात स्वाभाविकच म्हणावयास हवा. इंग्रजी वाङ्मयातील या दोन संप्रदायाचा उल्लेख डॉ. भटानी अर्थात केलेला नाही. तो त्यांच्या व्याख्यानाचा विषय नव्हता.

डॉ. भट रंगलेले आहेत आणि त्यांच्या लेखनाला धार आली आहे ती मात्र 'प्रणयदर्शन' व्याख्यानात. कालिदासाच्या साहित्याचा स्थायी भाव प्रणय आहे हे स्पष्टच आहे. कालिदासाची प्रणयविषयक वृत्ती निर्दोष आहे, ओंगळवाणी नाही हे त्यांच्या विवेचनाचे

मुख्य सूत्र आहे. बहुपत्नीकत्व रूढ असलेल्या काव्यातील प्रणयामध्ये एका-पेक्षा अधिक स्त्रियांच्याबाबत प्रणय करणारा नायक आजच्या काळात लंपट ठरत असला, तरी कालिदासकालात तो दोषार्ह ठरत नव्हता. विवाहित परस्त्रीवरील प्रेमाचे म्हणजे निषिद्ध प्रणयाचे चित्र कालिदास रंगवीत नाही. नायक-नायिका यांची परस्परानुरक्ती ही गोष्ट आवश्यक होती, नव्या प्रणयाने पहिलीशी अयोग्य वर्तन त्याचे नायक करीत नाहीत, स्नेह कमी झाला तरी त्याचे दाक्षिण्य सुटत नाही, योग्य तो मान ठेवला जात असे, असाच प्रणयविधि कालिदास काढतो. अशा प्रणयचित्रात आक्षेपार्ह असे काही आहे असे डॉ. मटाना वाटत नाही, आणि कालिदासकालीन आचारविचार परिस्थिती पाहता त्यांचे म्हणणे योग्यच म्हणावे लागेल. असे असल्याने शाकुंतलामध्ये प्रणयातील शुद्धीकरणाचा अर्थ पाहणाऱ्यांना कालिदासाचे मर्म समजले असे त्यांना वाटत नाही. प्रणयाच्या शुद्धीकरणाचा अर्थ शाकुंतलात पाहणाऱ्यांत अनेक थोर पंडित आणि कवी आहेत. त्यांचा नामाने उल्लेख न करिता डॉ. मटांनी त्यांच्या मतांचा परामर्श घेतला आहे. ते करीत असता त्यांची भाषा काही ठिकाणी तीव्र झाली असली तरी, त्यांचे म्हणणे योग्य आहे यात शंका नाही. डॉ. मटांच्या आधीही कोहींनी हा विचार मांडलेला होता, परंतु डॉ. मटांनी तो अधिक विस्ताराने आणि आवेशाने मांडला आहे. ते करीत असता प्रणयामध्ये शारीरिक आकर्षणाचा भाग मोठा, तीही जीवनाची प्रेरणा आहे, व त्यातील आसक्ती अंतर पावल्यास परिणत होते हा विचारही त्यांनी विस्ताराने मांडला आहे. क्वचित कालिदासाच्या उत्तान वर्णनांचेही समर्थन डॉ. मट करितात; तथापि एकंदर विवेचन यथार्थ असेच उपन्यासावे आहे. डॉ. मटांच्या रसिकतेचे दर्शन आस्वादक या विवेचनामधून चांगले होत आहे.

कालिदासाच्या विविध व्यक्तिमत्त्वाचे दर्शन हाच आपल्या

व्याख्यानाचा विषय डॉ. भटांनी निश्चित केला असल्याने त्यांच्या वाङ्मयाचे दर्शन यात येत नाही हे स्वाभाविकच आहे. वाचकाला कालिदासवाङ्मयाचा परिचय आहे असे समजूनच त्यांनी आपल्या विवेचनाचा रोख ठरविला आहे. त्यामुळे शाकुंतल किंवा मेघदूत हे विशेष चर्चा झालेले असे जे त्यांचे ग्रंथ, त्यांचा सविस्तर किंवा तपशीलवार परामर्श या व्याख्यानांतून आलेला दिसणार नाही. तथापि व्यक्तिमत्त्वदर्शनास आवश्यक असे निर्देश त्यांनी वेळोवेळी केलेले आहेतच. हे निर्देश करिताना मधूनमधून मूळातील शब्द त्यांनी तसेच ठेवून मूळाचा मराठी अनुवाद केलेला दिसतो. मात्र कोठेही मूळ संस्कृताची अवतरणे, कदाचित पांडित्यप्रदर्शनाच्या भयास्तव, त्यांनी कटाक्षाने देण्याचे टाळले आहे हे वाचकाच्या लक्षात येईल. अवतरणांच्या वजनाने दडपण किंवा संस्कृतच्या ज्ञानाची आवश्यकता या विवेचनात मुळीच भासत नाही. असे असूनही भाषेच्या प्रौढतेत काही उणीव आली आहे असेही वाटणार नाही. विवेचनात अथपासून इतिपर्यंत रजकताही कायम राखिली आहे. कालिदासविषयक मराठी ग्रंथात एका चांगल्या वाचनीय ग्रंथाची भर या पुस्तकाने पडली आहे असे म्हणण्यास कोणालाही संकोच वाटण्याचे कारण नाही.

—प्रा. रा. श्री. जोग

# हृद्गत

व्हीनस प्रकाशन आणि व्हीनस व्याख्यानमाला यांच्यातर्फे या वर्षीची चौथी व्याख्यानमाला गुंफण्यासाठी श्री. स. ह. पाध्ये आणि मला गुरुतुल्य असलेले प्रा. रा. श्री. जोग यांनी मला पाचारण केले. 'कालिदासदर्शन' हा विषय घेऊन मी तीन व्याख्याने दिनांक २०, २६ व २७ मार्च १९६७ रोजी पुण्यास दिली. त्या व्याख्यानांचे हे ग्रंथरूप, प्रथरूप.

कालिदासाच्या साहित्याचे अध्ययन आणि चिंतन यांमधून कालिदासाच्या कलात्मक व्यक्तिमत्त्वाची आणि त्याच्या कलेच्या स्वरूपाची जी एक प्रतिमा माझ्या मनात होती ती येथे यथामती, यथाशक्ती प्रकट करण्याचा प्रयत्न केला आहे. कालिदासाच्या साहित्याचा पूर्वपरिचय गृहीत धरून, समीक्षेच्या पातळीवर हे निवेदन केले आहे. व्याख्यानात आणि लेखनातही परिपूर्ण तपशीलापेक्षा तत्त्वग्रहणावर भर आहे, त्यामुळे सगळ्याच्या सगळे संदर्भ आणि तळटीपा यांचा उपयोग केलेला नाही.

मात्र व्याख्यानात ज्या गोष्टी, वेळेच्या मर्यादेत मांडता आल्या नाहीत किंवा सूचितपणे मांडल्या गेल्या त्या लिखितामध्ये शक्य तो पूर्णपणे मांडल्या आहेत. माझ्या विचारांना साहाय्य म्हणून, कालिदासाविषयींचे माझे जे प्रकाशित साहित्य आहे त्याची यादी सोबत दिली आहे.

ही व्याख्यानाची संधी प्राप्त करून दिल्याबद्दल श्री. पाध्ये आणि प्रा. जोग यांना मी अतीव ऋणी आहे. पुण्यातील श्रोत्यांनीही बहुसंख्येने उपस्थित राहून, ज्या समन्वयदारपणाने, सहानुभावाने आणि रसिकतेने या व्याख्यानांना दाद दिली त्याबद्दल त्यांचे आभार मानणे आवश्यक आहेच.

पुस्तकरूपाने ही व्याख्याने प्रसिद्ध करण्याची जबाबदारी व्हीनस प्रकाशनानेच स्वीकारलेली आहे याबद्दलही मी कृतज्ञ आहे. आता इतरानाही स्वतःची कालिदासविषयक प्रतिमा माझ्या प्रतिमेशी तुळून पाहाता येईल.

गोविन्द केशव भट

मलबार मॅन्शन,
३७ गार्डन रोड
अपोलो रेक्लमेशन
मुंबई १ ( बी. आर. )

कालिदासदर्शन

१. व्यक्तिदर्शन
२. विचारदर्शन
३. प्रणयदर्शन

"वागर्थाविव संपृक्तौ
वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वन्दे
पार्वतीपरमेश्वरौ ।"

अनुक्रम

साहित्यातील विद्या व कला यांचे संदर्भ व उद्देश अध्ययनाचे पूर्ण संस्कार

समस्यापूर्ती, वेश्या-सहवास याचा अर्थ प्राचीन गणिका, एक सुसंस्कृत संस्कारसंपन्न स्त्री, अनीतीची कल्पना अप्रयोजक प्राचीन 'गोष्ठी'

उज्जयिनी जन्मभूमी कर्मभूमी

(४) कलात्मक व्यक्तित्वाचे विशेष

अ पांडित्य व विदग्धता यांचा संगम

ललित कलांचा मार्मिक परिचय, विद्वत्तेचे प्रदर्शन नाही केवळ पांडित्य बोचत नाही, तात्त्विक अधिष्ठानाने केवळ उथळपणा नाही

आ. सौंदर्यासक्त दृष्टी नेहमीच्या कविदृष्टीहून वेगळी, उत्कट अवलोकनात अकल्पित तपशील

उत्स्फूर्त, प्रसंगी अप्रयोजकपणे प्रकटन, वैचारिक संगती उदाहरणे

इ निसर्गभावना

निसर्गाचे साहित्यातील विशेष स्थान

प्रवास वा सहृदय अवलोकन, बहुश्रुतता

निसर्गदृष्टीच्या चार अवस्था—वस्तुनिष्ठ अवलोकन, निसर्ग व मानव यांचे भावसाहचर्य, यातून स्फुरलेले तादात्म्य, निसर्ग एक जिवंत व्यक्ती

शाकुन्तलातील निसर्गवर्णन

ई जीवनाकडे खेळकर, आनंदी वृत्तीने पाहण्याची दृष्टी

विनोद विदूषकाचा, इतर पात्रांचा

हास्य, बौद्धिक विनोद

अजाण विनोद व नाट्यकल्पित

स्वतःची थट्टा करण्याचे मनाचे औदार्य

विदूषक

कुमारसंभवातील शिव

(५) आणखी एक विशेष :

जीवनातील कटुता, भीषणता टाळलेली.

भवभूति व कालिदास :

- नद्या, पर्वत इत्यादींची वर्णने.
- वीररसातील शृंगारच्छटा.
- रौद्रदर्शन.
- आश्रमातील ऋतूचे वर्णन.

कालिदासाच्या मनाचे आवड : पावित्र्य, प्रणय, शान्ती.

ही मर्यादा

आहे असे साहित्यशास्त्र सांगतात. 'काव्यम् यशसे' असे मम्मट म्हणतो. कालिदासालाही यशाची अपेक्षा होती, हे मालविकाग्निमित्राच्या प्रस्तावनेत त्याने होतकरू कवीच्या नव-काव्याची जी कैफियत सादर केली आहे त्यावरून स्पष्ट दिसते. रघुवंश लिहिताना 'कवियश प्रार्थी' आपण असल्याची कबुली त्याने देऊन ठेवलेली आहे. कामधेनूची कन्या नन्दिनी हिचे प्राण सिंहाच्या हातून वाचविण्यासाठी स्वतःचा देह अर्पण करणाऱ्या दिलीपाने, 'यशःशरीरे भव मे दयालुः' अशी सिंहाजवळ जशी प्रार्थना केली तशी कालिदासानेही कदाचित कालपुरुषाजवळ केली असावी. निदान कवीच्या मनोमनीची ही प्रार्थना कालाने ऐकून तिचा आदर केला आहे यात शंका नाही. यशाची गर्भी इच्छा असूनही या संस्कृत कवींनी आपल्या जीवनाविषयी मुग्धता स्वीकारली याचे कारण त्यांच्या विनयामध्ये सर्वस्वी सापडणार नाही. कालिदासासारखा एखादा कवी विनयी असला तरी आत्मप्रौढी मिरविणारे संस्कृत कवी काही कमी नाहीत, आणि त्यांनी आपली जीभ किंवा लेखणी आवरली तरी त्यांना कविश्रेष्ठ किंवा सरस्वतीचे साक्षात अवतार ठरविणारे त्यांचे चहाते काही कमी नाहीत. तेव्हा कवीने स्वतःविषयी न बोलणे हा संस्कृत साहित्यातील एक प्राचीन संकेत असावा असे दिसते. संस्कृत लेखकांना कालाची, इतिहासाची दृष्टी नाही, असल्यास फारच कमी आणि अपवादात्मक, असे जे म्हणण्यात येते ते खोटे नाही. कवीचे काव्य हे त्याच्याहून मोठे, आणि सृष्टिनियमाच्या पलीकडचे, अशी एक श्रद्धा किंवा भावडी समजूत या संकेताच्या मागे असल्यास नवल नाही!

कवीचे जीवन जाणून घेण्याची जी इच्छा आपल्याला असते ती कुतूहलाच्या आणि आदराच्या पोटी केवळ असते, असे म्हणता येणार नाही. कवीचे जीवन आणि त्याची साहित्यनिर्मिती यामध्ये

'कोमलकान्तपदावलि' ही त्याचीच मिरास! मानवी मनाचा अचूक वेध घेण्याची आणि तथाकथित दुष्ट व्यक्तींमधील माणुसकी टिपण्याची भासाची प्रतिभा अन्य संस्कृत लेखकात आढळणार नाही. असे असूनही कविताकामिनीचा विलास आणि कविकुलगुरु म्हणून मानाचा मुजरा जो मिळाला तो कालिदासालाच! याचे एक कारण कालिदासाच्या अपूर्व कलाविष्कारात आहेच, पण खंडकाव्य, महाकाव्य आणि नाटक अशा साहित्यरचनेचे वध सारख्याच यशस्वीपणे हाताळून साहित्याच्या प्रत्येक क्षेत्रात स्वतःसाठी गुरुपद निर्माण करण्याचा वाङ्मयीन विक्रम संस्कृत साहित्यात एकट्या कालिदासानेच केलेला आहे म्हणूनच त्याचे जीवन समजून घेण्याची उत्कंठा वाटते.

आणि कालिदास मात्र स्वतःविषयी काही बोलत नाही. या उत्कंठेमुळे आणि त्याच्या अपूर्व यशामुळे कालिदासाच्या जीवनाविषयी अनेक कथा निर्माण झाल्या असण्याचा संभव आहे या कथा कल्पित म्हणून त्याज्य असल्या तरी कालिदासाविषयी परंपरेचे मत कसे होते हे समजण्यासाठी त्यांची छाननी आवश्यक म्हटली पाहिजे.

[२]

अशाच एका दंतकथेप्रमाणे कालिदास ब्राह्मणकुळी जन्मला पण लहानपणीच पोरका झाल्याने तो एका गवळ्याच्या घरी वाढला. वय [illegible] वर्षापर्यंत हा गोपालनात, देखणा [illegible] वाढून सुदृढ बनला पण अशिक्षित, संस्कारहीन राहिला. ज्या देशात [illegible] रहात होता त्या देशाच्या राजकन्येला [illegible] सुंदर शरीर [illegible] आणि [illegible] निष्णात होती (आख्यायिका [illegible] तरी

तिची नायिका अशी सुंदर आणि चतुर असल्याखेरीज आख्यायिकेचे पाऊल तरी पुढे कसे पडावे!) राजकन्या जेव्हा वयात आली तेव्हा वरपरीक्षा करूनच आपला पती निवडण्याचा तिने हट्ट धरला. (हेही राजकन्येच्या स्वभावाला अनुसरूनच!) तिच्या अलौकिक गुणामुळे कोणीही वर तिच्या पसंतीला उतरेना. राजाप्रमाणे प्रधानही कंटाळून गेला. त्याने राजकन्येची खोड मोडायचा बेत केला. प्रधानाला योगायोगाने कालिदास दिसला आणि त्याने हा राजबिंडा मुलगा पाहून आपल्या कारस्थानासाठी त्याचा उपयोग करण्याचे ठरविले.

दुसऱ्या दंतकथेत या तपशिलात थोडा फरक आहे. काशीच्या राजाला आपल्या कन्येचा विवाह वररुचि या प्रसिद्ध वैय्याकरणाशी व्हावा असे वाटत होते. राजकन्येला वररुची आपल्या योग्यतेचा वाटला नाही म्हणून तिने नकार दिला. या अपमानाने वररुची चिडला आणि राजकन्येची खोड मोडण्यासाठी एका गवळ्याच्या मुलाला हाताशी धरून तिला पराजित करण्याचा डाव त्याने योजला, अशी दुसरी कथा आहे.

ते कसेही असो. आपल्या कथेप्रमाणे प्रधानाने या गवळ्याच्या मुलाला घरी आणून न्हाऊपिऊ घातले, अलंकारांने त्याला नटविले, आणि आपल्या बेताची थोडी कल्पना देऊन त्याला एकच ताकीद दिली की त्याने काहीही झाले तरी तोंड उघडायचे नाही, काही बोलावयाचे नाही. ही तयारी झाल्यावर प्रधानाने काशीहून वेगवेगळ्या शास्त्रांत आणि कलांत निपुण असलेल्या तरुण पंडितांचा ताफा आणविला आणि राजकन्येला निरोप पाठविला की आपल्या पाणिग्रहणासाठी काशीहून एक विद्वान आपल्या शिष्यांसमवेत आलेले आहेत, त्यांच्या शिष्यांची आपण अगोदर परीक्षा घ्यावी आणि मग वाटल्यास गुरूंची घ्यावी. राजकन्येने हे मान्य केल्यावर दरबारात भेटीचा आणि परीक्षेचा दिवस ठरला. बैठक भरल्यावर प्रश्नोत्तरीला

जेव्हा सुरुवात झाली तेव्हा राजकन्येने एखाद्या शास्त्रातला प्रश्न विचारावा आणि त्याला या तथाकथित शिष्यगणापैकी एकाने तत्काल उत्तर द्यावे असे होऊ लागले. राजकन्येचे प्रश्न विविध असले तरी त्यांची उत्तरे देणारे विद्वान तेथे होतेच. या पंडितांची विद्वत्ता पाहून राजकन्या दिपून गेली, आणि तिला साहजिकच वाटले की शिष्य जर एवढे विद्वान तर त्यांचा गुरू किती थोर असला पाहिजे! गुरूची परीक्षा करण्याची तिला आवश्यकताच वाटली नाही. गुरूचे, म्हणजे या गवळ्याच्या मुलाचे, रूपही देखणे होते; आणि प्रधानाने त्याला भरजरी वस्त्राभरणांनी आणि अलंकारांनी नटविण्याची अगोदरच काळजी घेतलेली असल्याने दरबारात तो एखाद्या राजपुत्राप्रमाणे शोभत होता. रूप आणि विद्वत्ता यांचा संगम पाहून राजकन्या मोहित झाली आणि या मुलाशी विवाह करण्यास ती राजी झाली. यथाविधी विवाहाचा सोहळा पार पडला. या तरुण मुलाची आणि राजकन्येची प्रथम एकान्तात भेट झाली. त्या प्रसंगी मात्र कोणाचा आधार नसल्याने हा मुलगा गांगरून गेला. राजकन्येलाही संशय आला. वारंवार विचारूनही तो काही बोलेना तेव्हा राजकन्येने तरवार उपसून त्याला धमकी दिली. आता मात्र हा मुलगा फार घाबरला आणि आपल्या संस्कारहीन भाषेत त्याने सगळी हकीकत राजकन्येला सांगितली. संतापाने आणि लज्जेने राजकन्या चूर झाली. आपल्या या गोऱ्या-गोमट्या पण अडाणी पतीला राजवाड्यातून तिने घालवून दिले; 'काही तरी कर्तृत्व करून दाखविल्याशिवाय आणि विद्वत्ता संपादन केल्याशिवाय आपल्याला पुन्हा तोंड दाखवू नकोस' अशीही [illegible] राजकन्येने दिली. त्याच्या प्रकाराने या तरुण मुलाच्या मनावरही फार खोलवर परिणाम झाला. त्याच्या जीवनाचे एक नवे पान उलटल्यासारखे झाले. तो राजवाड्यातून थेट कालिमातेच्या मंदिरात गेला आणि देवीच्या पायाशी धरणे धरून बसला. देवी प्रसन्न झाली नाही

वर आपले मस्तक आपटून तिच्या चरणी वाहण्याचा संकल्प करून तो मंदिरातच बसून राहिला. ही आख्यायिका सांगते की त्याची ती निष्ठा पाहून काली प्रसन्न झाली आणि तिने आपल्या कृपेचा वरदहस्त त्याच्या मस्तकी ठेवला. या कृपेने त्याच्या अंगी प्रतिभेचा आणि विद्वत्तेचा संचार झाला. त्याला 'कालिदास' असे नाव आपोआपच प्राप्त झाले. कालिदास तेथून सरळ स्त्रियेचे माहेरघर अशा काशीस गेला आणि थोड्या काळातच सर्व विद्यांचे अध्ययन करून तो पंडित झाला.

काशीहून परतल्यावर कालिदास प्रथम राजकन्येला भेटावयास गेला. आपल्या दुर्दैवी जीवनाला दोष लावीत, पण भारतीय धर्मनिष्ठ पत्नीप्रमाणे, ती त्याची वाट पहात बसलीच राहिलेली होती. कालिदासाला तिने लगेच ओळखले. इतर काही नाही तरी आपल्या पतीच्या वाणीवर तरी शुद्ध संस्कार होऊन त्याच्या बोलण्यात काही फरक पडला आहे की नाही हे पाहण्याच्या इच्छेने तिने त्याला विचारले : 'अस्ति कश्चिद् वाग्विशेषः'? तिच्या प्रश्नाला उत्तर देताना कालिदासाने प्रश्नवाक्यातला एकेक शब्द घेऊन त्या शब्दाने आरंभ होणारे एकेक काव्य तत्क्षणी रचले : 'अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा' असा आरंभ करून 'कुमारसंभव' काव्य, 'कश्चित् कान्ताविरहगुरुणा' अशी सुरुवात करून 'मेघदूत' आणि 'वागर्थाविव संपृक्तौ' हा आरंभ असलेले 'रघुवंश', ही काव्ये कालिदासाने उत्स्फूर्त रचली आणि राजकन्येला घडावेड म्हणून दाखविली. पती परत मिळाल्याने राजकन्या आधीच मनातून आनंदित झालेली होती. त्यात विद्वत्तेचा आणि कवित्वाचा हा अलौकिक साक्षात्कार पाहून ती स्तंभितच झाली असावी. परंतु जीवनात ज्या गोष्टी घडल्या त्यांनी कालिदासात खरोखरीच परिवर्तन झालेले होते. ज्या राजकन्येमुळे आपल्या आयुष्यात ही क्रान्ती घडली ती राजकन्या त्याला देवतातुल्य,

गुरुतुल्य वाटू लागली होती. राजकन्येला मर्त्य नको होती, प्रेम हवे होते, पती हवा होता. विनवणी करूनही कालिदास जेव्हा तिच्या बरोबर पती म्हणून रहाण्यास तयार होईना त्या वेळी राजकन्या संतापली, व्यथित झाली तिने चिडून शाप दिला की ज्या अर्थी तुझ्याशी एकनिष्ठ असलेल्या पत्नीचे प्रेम तू झिडकारले आहेस त्या अर्थी एका स्त्रीच्या हातून तुला मरण येईल!

कालिदास राजकन्येला सोडून गेला आणि स्वतंत्रपणे जीवन जगू लागला. पुढे त्याने नाट्यरचना केली. कवी म्हणून तो प्रथितयश झाला. परंतु शापाच्या प्रभावामुळे म्हणा किंवा विलासक्तेमुळे म्हणा, त्याच्या खाजगी जीवनात स्थिरता आली नाही. या दंतकथेप्रमाणे त्याचा मोकळा वेळ बहुतेक वेश्यांच्या सहवासात जाऊ लागला. असाच एकदा, उत्तरवयात, आपला मित्र 'जानकीहरण' काव्याचा कर्ता कुमारदास याच्या आग्रहावरून त्याला फार वर्षांनी भेटण्यासाठी म्हणून तो सिंहलद्वीपास गेला. परंतु तेथेही मित्राच्या घरी जाण्या-ऐवजी तो एका वेश्येकडे कोणाला न कळविता उतरला. सिंहलद्वीपाच्या राजाने, 'कमले कमलोत्पत्तिः श्रूयते न तु दृश्यते।' अशी एक समस्या दिली होती, आणि समस्यापूर्ती करणाऱ्याला मोठे बक्षीस देऊ केले होते. कालिदास आल्याची बातमी कशी तरी कळून त्याचा ठावठिकाणा न लागल्याने त्याचा शोध लावण्यासाठी कुमारदासानेच ही समस्यापूर्तीची युक्ती योजली असण्याचाही समज आहे. कसेही असो, ही समस्यापूर्ती करील असा कोणीही कवी पुढे येऊ शकला नाही. वेश्येकडून कालिदासाला ही हकीकत सहजी कळली. त्याने हसत चटकन दुसरी ओळ रचून समस्यापूर्ती करून दाखविली : 'बाले, तव मुखाम्भोजात् कथ इन्दीवरद्वयम्॥' [ कमळातून कमळ उगवते असे ऐकले आहे, पाहिले मात्र नाही. पण मग बाले, तुझ्या मुखकमलातून ही नेत्रांची दोन निळी कमळे कशी निघालीत? ]

वेश्येला कालिदास कोण हे माहीतच नव्हते पण आता तिला त्याचा लोभ सुटला. गुप्तपणे मारेकरी घालून तिने कालिदासाचा खून करविला. मग समस्यापूर्तीची ओळ घेऊन ती राजाकडे गेली आणि बक्षिसावर हक्क सांगू लागली राजकवी कुमारदासाला संशय आला. त्याने बारकाईने चौकशी केली तेव्हा वेश्येला दरडावून खटसून विचारले. तिने झालेला सर्व प्रकार कबूल केला एका दृष्टीने राजकन्येची धार खाणी खरी ठरली. आपल्या प्रतिभावान मित्राचा असा हृदयद्रावक अंत झालेला पाहून कुमारदास मात्र दुःखात बुडून गेला कालिदासाच्या पार्थिव देहाला अग्निसंस्कार करते वेळी त्याने स्वतःलाही त्याच चितेवर टाकून घेतले. ही कथा सिलोनमध्ये अजून दाखविवात म्हणे!

बल्लाळसेन कवीने मनोरंजनासाठी तयार केलेल्या 'भोजप्रबंध' नामक ग्रंथात कालिदास हा भोजाच्या पदरी असलेल्या नऊ रत्नांपैकी एक तेजस्वी रत्न असल्याचे सांगितलेले आहे या ग्रंथात कालिदासाच्या समस्यापूर्ती करण्याच्या चातुर्याच्या, आणि समस्यापूर्ती करून अनेक दरिद्री पण अविद्वान ब्राह्मणांना त्याने राजाकडून द्रव्यसहाय्य करविल्याच्या आख्यायिका गुंफलेल्या आहेत

अशा दंतकथा आणि आख्यायिका यावरून कालिदासाचे जीवन आणि व्यक्तिमत्त्व याविषयी ज्या महत्त्वाच्या गोष्टी सूचित होतात त्या अशा—

(१) कालिदास ब्राह्मण कुलात जन्मलेला पण पोरका आणि अशिक्षित. विद्वत्तेचा आणि कवित्वाचा आविष्कार त्याच्यात झाला तो देवीच्या प्रसादाने, अलौकिक चमत्कार घडून.

(२) कालिदासाचे राजघराण्याशी नाते किंवा निदान निकटचे संबंध असावेत.

(३) कवित्वाबरोबरच समस्यापूर्तीच्या त्याच्या चातुर्याची प्रशंसा.
(४) गरीब ब्राह्मणाना द्रव्यसाहाय्य करण्याचे किंवा करविण्याचे त्याचे औदार्य.
(५) त्याच्या खाजगी जीवनाची अस्थिरता आणि एका दृष्टीने त्याचे रंगेल व नीतिबाह्य वर्तन.

[३]

वर उल्लेखिलेल्या दंतकथा व आख्यायिका आणि त्यावरून निघणारे निष्कर्ष निःसंशय रीतीने पडताळून पाहता येतील अशी साधने किंवा पुरावा आपल्याजवळ नाही. निश्चित इतिहास किंवा इतिहाससदृश माहिती यांच्या अभावी आपल्याला एकच मार्ग उरतो. कालिदासाचे साहित्य तपासून पाहून, त्यावरून त्याच्या जीवनाची किंवा व्यक्तिमत्त्वाची जी कल्पना येते ती वरील दंतकथांशी किती जुळणारी आहे हे आपल्याला पाहता येईल. अर्थात कवीचे साहित्य म्हणजे त्याचे आत्मचरित्र नव्हे किंवा त्याच्या जीवनाचा तपशील उलगडून दाखवणारा इतिहासही नव्हे, हे आपण मान्य केलेच पाहिजे. याच्या जोडीला आणखी एका साहित्यिक सत्याला आपल्याला मान्यता द्यावी लागते. कवीचे खाजगी जीवन आणि त्याचे साहित्य यांमध्ये विलक्षण तफावत असू शकते. आपल्या कादंबऱ्यांनी प्रचलित नीतिकल्पनाना जबरदस्त धक्के देणारा डी. एच्. लॉरेन्स हा व्यक्ती म्हणून एक साधा आणि सरळ माणूस होता. आपल्या जिभेच्या आणि लेखणीच्या दरारााने ज्याने मल्यामल्यांची कत्तल केली तो बर्नार्ड शॉ परराध्या अस्सल ब्राह्मणाप्रमाणे शाकाहारी होता. आणि याच्या उलट साहित्यामध्ये तत्त्वचिंतक आणि द्रष्टा म्हणून गणल्या

गेलेल्या टॉलस्टॉयच्या खाजगी जीवनाचे जे काही तपशील उजेडात आले आहेत ते विस्मय उत्पन्न करणारे आहेत. मात्र वरील दोन्ही साहित्यिक तत्त्वे स्वीकारूनही एक गोष्ट अशी कबूल करावीच लागेल की साहित्य हे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने कलावंताच्या व्यक्तिमत्त्वाने रंगलेले असते. जीवनातील अनुभूतींची निवड, अनुभूतींना मिळणारी कलात्मक मांडणी, आणि साहित्यिक चित्रणातून प्रकट होणारे विचार यामध्ये कविमनाच्या आवडी–निवडी आणि त्याची जीवन-मूल्ये सूचित झाल्याशिवाय राहात नाहीत. मिल्टन तर म्हणतो, 'A precious literary work is the life-blood of a master-spirit.' या उद्गाराचा अर्थ आपण निदान इतका तरी घेऊ शकतो की साहित्यात, कवी जरी नाही तरी त्याचे कलात्मक व्यक्तित्व,. त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे उज्ज्वल किंवा लक्षणीय विशेष प्रतिबिंबित होतात. या विशेषांचा शोध आरंभ घेतला तर कवीच्या *वैयक्तिक जीवनाचा जरी आपल्याला अंदाज लागला नाही तरी* त्याच्या वैचारिक जीवनाची प्रतिमा आपल्याला दिसून येईल. कालि-दासाविषयीच्या आख्यायिका आणि त्याचे साहित्य यांची तुलना करावयाची ती याच उद्देशाने.

वरील दंतकथातील कालाबाबत तपशील ऐतिहासिक प्रमाणावरून आपल्याला लगेच त्याज्य ठरवता येईल. इ. स. अकराव्या शतकातल्या भोजाशी कालिदासाचा संबंध अशक्य आहे. कालिदासाचा काल अनिश्चित असला तरी इ. स. च्या तिसऱ्या–चौथ्या शतकाच्या पलीकडे हा काल नेता येणार नाही असे आजवरच्या संशोधनाने सिद्ध झालेले आहे. भोज दरबारच्या नवरत्नांच्या यादीत कालविपर्यास आहे. वेग-वेगळ्या शतकांत होऊन गेलेले कवी इथे एकत्र आणून बसविलेले आहेत. साहजिकच अशा कल्पित आणि असंभाव्य तपशिलामुळे या

दंतकथा आणि आख्यायिका पूर्णपणे अव्हेरण्याकडे मनाचा कल होतो.

परंतु या दंतकथा म्हणजे पराचा कावळा अशा स्वरूपाच्या असल्या तरी येथील 'पर' थोड्या चिकित्सेने पाहावयास हरकत नाही. कालिदासाचे राजघराण्याशी संबंध जवळचे दिसतात. त्याच्या तिन्ही नाटकांचा आणि रघुवंशाचा विषय राजचरित्र हाच आहे. रघुवंशातील वर्णन पुराणकालीन राजांचे आणि आदर्शाच्या रंगांनी रंगविलेले असले तरी नाटकांत मात्र राजजीवनाचे खाजगी दालन कालिदासाने उघडे केले आहे. तत्कालीन राजाचा खाजगी जीवनक्रम, अंतःपुरातील त्याचे वर्तन, त्याची प्रेमप्रकरणे, अंतःपुरातील स्त्रीजीवनाची चित्रणे, राजदरबाराची रीत आणि व्यवहाराचे उपचार, राजघराण्यातील व्यक्ती, राजाचे अधिकारी यांच्या वर्तनाची पद्धती इत्यादी तपशील कालिदासाने फार ठळक आणि अचूक दिलेला आहे. या चित्रणात काही संकेत असले तरी प्रत्यक्ष अनुभवाचा ताजेपणाही आहे असे आपल्याला दिसून येते. साहित्याच्या दृष्टीने तर आपण असे म्हणू शकतो की राजदरबारी, प्रणयप्रधान, सुखात्म नाटकाचा बंध कालिदासानेच निर्माण केला, निदान या कथाला पहिली प्रतिष्ठा त्यानेच मिळवून दिली. हे सर्व लक्षात घेतले म्हणजे राजजीवनाचे अगदी जवळून अवलोकन करण्याची संधी त्याला आपल्या आयुष्यात मिळालेली असली पाहिजे असे म्हणता येईल. कालिदासाला राजाश्रय होता, तो विक्रमादित्य किंवा अशाच कोणा राजाचा आश्रित आणि राजकवी होता असे सामान्यपणे मानण्यात येते. यापेक्षाही राजजीवनाशी अधिक जवळचा संबंध कालिदासाचा असल्यास असंभवनीय नाही. दंतकथेप्रमाणे त्याचा विवाह राजकन्येशी झालेला होता. हे खरे नसले–नसावे–तरी राजकवीपेक्षा काही अधिक मानाचे स्थान त्याच्याकडे असावे. कवी किंवा शास्त्रज्ञ राजाचे अधिकारी असल्याची नोंद संस्कृत साहित्याच्या इतिहासात मिळते. या दृष्टीने एका विशेष उल्लेखाकडे लक्ष वेधावे

अशी इच्छा आहे. मेघदूतामध्ये यक्ष मेघाची प्रारंभी स्तुती करताना त्याला 'इंद्राचा प्रकृतिपुरुष' असे संबोधतो (जानामि त्वा प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः । मेघदूत, ६ ). हा शब्दप्रयोग विलक्षण आहे. सांख्य तत्त्वज्ञानाप्रमाणे आणि साध्या वैचारिक दृष्टीनेही प्रकृतिपुरुष या जोडशब्दात मुळात निरोधाभास नाही, तर विरोध आहे. प्रकृती शब्दाचे अनेक अर्थ कोशात दिलेले आहेत. त्यातील प्रस्तुत वर्णनाशी जुळणारा असा एकच अर्थ आहे आणि तो राजकीय संदर्भातून येतो. प्रकृति शब्दाने राजाचा मंत्री, मंत्रिमंडळ, किंवा प्रजाजन असे राजकीय अर्थ सूचित होतात. प्रकृतिपुरुष याचा अर्थ मग 'राजाचा मंत्री, अधिकारी' एवढाच होईल. इंद्र ही वर्षादेवता आहे; या वर्षाचे पृथ्वीवर अर्पण करणारा इंद्राचा प्रतिनिधी किंवा सेवक म्हणजे मेघ. या मेघवर्णनात या अर्थाने औचित्य आहे, आणि हे वर्णन करण्यात कविकल्पनेची झेपही आहे. परंतु मेघाचे वर्णनकार्य येथे अप्रस्तुत आहे. यक्षाला अभिप्रेत असलेली मेघाची वृत्ती म्हणजे त्याची प्रमती. म्हणूनच हा शब्दप्रयोग विलक्षण वाटतो आणि लक्ष वेधून घेतो. मेघाला प्रकृतिपुरुष म्हणणारा कालिदास स्वतःच तर प्रकृतिपुरुष नसेल ना ? असा समज आहे की, कालिदास राजाचा मंत्री असेल, कोठल्या तरी राजकीय कामगिरीवर राजाने त्याला पाठविलेले असेल. घरापासून दूर राजकीय कामगिरी बजावीत असता त्याला दीर्घकाळ राहावे लागले असेल; आणि मग 'आषाढस्य प्रथमदिवसे' वर्षामेघ पाहून घराच्या आठवणीने कालिदासाचेही हृदय भरून आले असेल. मेघदूताचा जन्म अशा स्वानुभूतीत तर झाला नसेल ! अर्थात हे साहित्यावरून काढलेले अनुमान आहे; पण त्याची संभाव्यता मनाला मोह घालणारी आहे. शाकुन्तलामध्येही शकुन्तला आणि तिच्या मैत्रिणी यांना दुष्यन्त आपली ओळख करून देताना स्वतःला 'राजपुरुष' म्हणून म्हणवितो. मेघदूतातील आणि शाकुन्तलातील हे दोन

कालिदासाच्या बुद्धीत विलक्षण तेज असणे अशक्य नाही, आणि त्यामुळे त्याचे विद्याग्रहण फार लौकर पूर्ण झाले असेलही. लव आणि कुश यांची बुद्धी विलक्षण असल्याने आत्रेयीसारख्या सामान्य विद्यार्थिनीला त्यांच्याबरोबर शिकताना अडचण झाली; आणि तिने वाल्मीकीचे विद्यालय सोडून अगस्ती ऋषींच्या आश्रमात वेदान्ताचा अभ्यास पुरा करण्याचे ठरविले, असे भवभूति वर्णन करतो. कालाइल्चीही अशीच गोष्ट सांगतात. एक तत्त्वचिंतक आणि निबंधकार म्हणून मान्यता पावलेला हा लेखक बालपणी जरा जड होता. वयाच्या तिसऱ्या चौथ्या वर्षापर्यंत त्याला बोलताही येत नव्हते आणि मग तो अचानक बोलू लागला ते एकदम संपूर्ण वाक्य उच्चारूनच. अशीच काही तरी चमत्कारपूर्ण घटना कालिदासाच्या आयुष्यात घडली असेलही. परंतु असा चमत्कार जेव्हा सर्व जीवनाचे स्पष्टीकरण करू पाहतो तेव्हा त्यात अतिशयोक्ती आणि विभूतिपूजा आहे असे म्हटल्यावाचून गत्यंतर नाही. वाल्मीकीच्या प्रतिमास्फुरणाची अशीच कथा आहे. तेव्हा, उत्स्फूर्त महाकाव्ये बोलल्या बोलला म्हणून दाखविण्याचा चमत्कार कालिदासाच्या चाहत्यांच्या मनातच घडला असावा. कालिदासाच्या अपूर्व काव्यशक्तीला दैवी वलय जोडण्याचा हा प्रयत्न दिसतो. कालीच्या प्रसादाची कथा अशीच नावाच्या कोटीमधून जन्माला आली असावी.

कालिदासाचे समस्यापूर्तीचे कसब आणि वेश्यालीरताशी त्याचा निकट परिचय या, दंतकथांत सूचित असलेल्या, दोन गोष्टींचा एक अकल्पित संबंध आहे त्याची कल्पना आज करताच येणार नाही. प्राचीन काळातील वेश्या किंवा गणिका ही फार वेगळ्या प्रकारची स्त्री होती. कालिदासाची उर्वशी, मृच्छकटिकातील वसन्तसेना ही अशा स्त्रियांची उदाहरणे. ही गणिका अत्यंत शिक्षित आणि ललित कलामध्ये

शब्द एकाच अर्थाचे आहेत. कालिदासाच्या स्वतःच्या अधिकार-स्थानाचे प्रतिबिंब या नेहमीपेक्षा वेगळ्या शब्दप्रयोगात नकळत पडले असावे असे राहून राहून वाटते.

साहजिकच राजदरबारात, राजकवी आणि राजाचा मंत्री म्हणून मानाच्या स्थानी असलेला कालिदास तत्कालीन विद्या आणि राजकारण यात निष्णात असलाच पाहिजे. असे असल्याविना राजकीय स्थान लाभणे शक्य नाही. कालिदासाच्या साहित्यातही त्याच्या चतुरस्र विद्याग्रहणाची साक्ष आहे. वेद, उपनिषदे, गीता, वेदान्त, सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा इत्यादी प्राचीन साहित्याचे आणि दार्शनिक तत्त्वप्रणालींचे उल्लेख त्याच्या काव्यनाटकांत आढळून येतात. अर्थशास्त्र आणि राजनीती याचेही त्याचे ज्ञान अचूक आहे.

शिवाय कवी म्हणून त्याने पूर्वतयारी केली असलीच पाहिजे. संस्कृत आणि प्राकृत भाषा आणि त्यांचे व्याकरण; छंद आणि अलंकारशास्त्र यांचा अभ्यास, आणि या संदर्भात रचनेची मौज म्हणून सहज आठवणाऱ्या त्याच्या व्याकरणविषयक उपमा; रघूच्या नवव्या सर्गातील यमक–अनुप्रासाचा वध आणि शाकुन्तलात कण्वांनी उच्चारलेल्या अभिस्तुतीत वैदिक त्रिष्टुप् छंदाची योजना; साहित्यनिर्मितीला उत्प्रेरक असणारा प्राचीन कवींचा, विशेषतः वाल्मीकींसारख्या आदिकवींचा सघन संस्कार, रामायण, महाभारत, पुराणे यांचा सूक्ष्म अभ्यास, कामसूत्रात अभिप्रेत असलेल्या प्रेमव्यवहाराचे मार्मिक ज्ञान, इत्यादी गोष्टीही त्याच्या साहित्यावरून सहज अनुमानिता येतात.

आणि हे जर खरे तर काही अलौकिक चमत्कारामुळे कालिदास एकाएकी ज्ञानी झाला असे म्हणण्यापेक्षा, त्यानेच आपल्या साहित्यात ज्याचे वर्णन करून ठेविले आहे अशा एखाद्या गुरुकुलात किंवा आश्रमात त्याचे अध्ययन झाले असावे, असे मानणे अधिक उचित.

कालिदासाच्या बुद्धीत विलक्षण तेज असणे अशक्य नाही; आणि त्यामुळे त्याचे विद्याग्रहण फार लौकर पूर्ण झाले असेल्ही. लव आणि कुश यांची बुद्धी विलक्षण असल्याने आत्रेयीसारख्या सामान्य विद्यार्थिनीस त्यांच्याबरोबर शिकताना अडचण झाली; आणि तिने वाल्मीकीचे विद्यालय सोडून अगस्ती ऋषींच्या आश्रमात वेदान्ताचा अभ्यास पुरा करण्याचे ठरविले, असे भवभूति वर्णन करतो. कार्लाइलचीही अशीच गोष्ट सांगतात. एक तत्त्वचिंतक आणि निःपक्षपाती म्हणून मान्यता पावलेला हा लेखक बालपणी फार मंदच होता. वयाच्या तिसऱ्या चौथ्या वर्षापर्यंत त्याला बोलताही येत नव्हते आणि मग तो अचानक बोलू लागला ते एकदम संपूर्ण वाक्य उच्चारूनच. अशीच काही तरी चमत्कारपूर्ण घटना कालिदासाच्या आयुष्यात घडली असेल्ही. परंतु असा चमत्कार जेव्हा सर्व जीवनाचे स्पष्टीकरण करू पाहतो तेव्हा त्यात अतिशयोक्ती आणि तिखटमीठ आहे असे म्हटल्यावाचून गत्यंतर नाही. वाल्मीकीच्या प्रतिभास्फुरणाची अशीच कथा आहे. तेव्हा, स्फूर्त महाकाव्ये बोलल्या बोलल्या म्हणून दाखविण्याचा चमत्कार कालिदासाच्या चाहत्यांच्या मनातच घडला असावा. कालिदासाच्या अपूर्व काव्यशक्तीला दैवी वलय जोडण्याचा हा प्रयत्न दिसतो. कालीच्या प्रसादाची कथा अशीच नावाच्या कोटीतून जन्माला आली असावी.

कालिदासाचे समस्यापूर्तीचे प्रसंग आणि वेश्यांशी त्याचा निकट परिचय या, दंतकथांत सूचित असलेल्या, दोन गोष्टींचा एक अकल्पित संबंध आहे. त्याची कल्पना आज करताच येणार नाही. प्राचीन काळातील वेश्या किंवा गणिका ही फार वेगळ्या प्रकारची स्त्री होती. कालिदासाची उर्वशी, मृच्छकटिकातील वसन्तसेना ही अशा स्त्रियांची उदाहरणे. ही गणिका अत्यंत शिक्षित आणि ललित कलांमध्ये

पारगत अशी स्त्री असे. तत्कालीन विद्वान आणि विदग्ध नागरिक काव्यशास्त्रविनोदासाठी जेव्हा एकत्र जमत तेव्हा अशा सभाना या चतुर गणिकाही हजर असत. या सभाचे प्राचीन नाव ' गोष्ठी ' असे आहे. वात्स्यायनाच्या कामसूत्रात या गोष्ठींचे आणि त्यात चालणाऱ्या चर्चा-प्रमोदाचे सूचक वर्णन आहे. बाणानेही हर्षचरितामध्ये अशा गोष्ठींचा उल्लेख केला आहे. या गोष्ठींमध्ये करमणुकीचा एक प्रकार म्हणून ( द्यूताव्यतिरिक्त ) प्रहेलिका, बिन्दुमती, समस्यापूर्ती अशा साहित्यिक क्रीडाचाही समावेश असे आणि त्यात नागरिक किंवा कवीच नव्हे तर गणिकाही भाग घेत. आज फारसा माहीत नसलेला हा तपशील ध्यानी घेतला म्हणजे, गणिकेचे नाव घेतल्यावर जी एक अनीतीची कल्पना मनात येते ती किती अनाठायी आहे हे समजून येईल. जन्माने आणि पेशाने या स्त्रिया वेश्यावर्गातल्या; पण शिक्षण आणि कला यांचे संस्कार असे की कोणत्याही सुविद्य पुरुषाशी त्या स्पर्धा करू शकत. शिवाय हा जन्माचा कलंक त्याना कायमचा लागलेला होता असेही नसावे. नाही तर उर्वशी पुरूरवा, शर्विलक मदनिका आणि चारुदत्त-वसंतसेना यांच्या विवाहाची कल्पना तरी कशी करता येईल ? *पुरूरव्यासारखा राजा आणि शर्विलक, चारुदत्त यांच्यासारखे ब्राह्मण या गणिकांशी विवाहबद्ध होतात,* याचा अर्थ सामाजिक आणि सांस्कृतिक दृष्टिकोणातून आपण समजून घेतला पाहिजे. प्राचीन समाजातील गणिकेचे हे सांस्कृतिक स्थान लक्षात आले म्हणजे गणिकेच्या सहवासाला एक वेगळाच अर्थ येईल. हा सहवास म्हणजे शिक्षित, सांस्कृतिक आणि कलासंपन्न पातळीवरील स्त्रीपुरुषाचा सामाजिक सह वास. दंतकथेवरून मनात येणारा अर्थ आणि कालिदासाबद्दल होऊ पाहणारा गैरसमज या स्पष्टीकरणाने दूर व्हावा.

गोष्ठींमध्ये चालणाऱ्या काव्यशास्त्रविनोदात कालिदास अग्रभागी असल्यास नवल नाही. आणि समस्यापूर्ती करून त्याने सभा जिंकल्या

असल्यास किंवा त्या द्वारा गरीब ब्राह्मणांना साहाय्य केले असल्यास त्यातही नवल नाही. त्याचे औदार्य त्याच्या दरबारी स्थानामुळे जसे कल्पित होईल, तसे ते त्याच्या मनोवृत्तींचा एक भाग आणि चारित्र्याचा गुण म्हणूनही कल्पिता येईल.

मात्र दंतकथांमधील रखेलणीचा निर्देश स्त्री-पुरुषसंबंधाच्या सामाजिक नीतीशी जोडला जात असेल तर मात्र तो स्वीकारण्यास आपले मन तयार होणार नाही. कालिदासाचे अपूर्व साहित्य, त्याची अद्वितीय कला, यांच्याविषयी आपल्याला वाटणाऱ्या आदरामुळे, भक्तीमुळे, केवळ आपण हा आरोप नाकारू असे नाही. कालिदासाच्या साहित्यातच या आरोपाला स्थान नाही. शृंगाराचा मुक्त विलास मानणारा हा कवी कुठेही निषिद्ध प्रेम वर्णन करीत नाही. त्याने दिलखुलासपणे रंगविलेले प्रेम हे विवाहबद्ध होणाऱ्या प्रेमिकांचे आणि पति पत्नींचे प्रेम आहे. त्याचे नायक तत्कालीन समाजाचे नेते आणि आदर्श आहेत. त्याच्या नायिकांमध्ये मुग्ध, लज्जाशील राजकन्येपासून तो निर्भय निश्चयी कन्येपर्यंत, आणि यांच्याशिवाय लज्जाशील असे सदाचरण करणाऱ्या देवकन्येपर्यंत अनेक स्त्रिया आहेत. सर्वच पतिनिष्ठ आणि शुद्धशील आहेत. शिवाय कालिदासाच्या या प्रणयसृष्टीत निर्व्याज स्नेहवर्षाव करणाऱ्या मैत्रिणी आहेत; हिमालय, कण्व यांच्यासारखे देवतुल्य वत्सल पिते आहेत, आणि मन मोहून घेणारी सर्वदमनासारखी गोड बालके आहेत. ही सृष्टी निर्माण करणारा कवी खाजगी जीवनात अनैतिक असणे कठीण आहे. कालिदासाच्या शृंगारचित्रणाचा हा विपर्यस्त अर्थ प्राचीन काळच्या एखाद्या संस्कृतिसंरक्षकाने केला असावा की काय!

आणखी एक गोष्ट. कालिदासाविषयीच्या आख्यायिकांमध्ये उज्ज-यिनी आणि काशी यांचा उल्लेख येतो. काशी प्राचीन काळापासून

विद्यासेन म्हणून प्रसिद्ध आहे. कालिदासाचे शिक्षण तेथे झाले असणे समर्थनीय आहे. उज्जयिनी मात्र कालिदासाची जन्मभूमी किंवा कर्मभूमी तरी असावी. एरव्ही रामटेकपासून अलकेपर्यंतचा प्रवास करणाऱ्या मेघाला यक्षाने मुद्दाम वाकडी वाट करून उज्जयिनीला जायला सांगितले नसते.

■

## [४]

कालिदासाच्या व्यक्तिमत्वाच्या इतर छटा आता त्याच्या साहित्यावरून पाहिल्या पाहिजेत.

[अ] कालिदासाच्या विद्याभ्यासाचा, शास्त्रविषयक ज्ञानाचा आणि कवी म्हणून त्याच्या पूर्वतयारीचा उल्लेख वर केला आहे. मम्मटाच्या भाषेत बोलावयाचे म्हटल्यास ही लोक, शास्त्र आणि काव्य यांच्या अवेक्षणाने येणारी ' निपुणता ' होय. यात आणखी काही गोष्टींचा निर्देश स्पष्ट करणे इष्ट आहे. गुरुकुलातील प्राचीन काळची शिक्षणपद्धती एकांगी नसावी. म्हणजे केवळ व्याकरण आणि शास्त्रे यांचाच अभ्यास तेथे करून घेतला जात असे असे नाही. शकुन्तलेची प्रणयविह्वल अवस्था पाहून, अशा अनुभवाला अनभिज्ञ असलेली अनसूयाही शकुन्तलेच्या स्थितीचे अचूक निदान करते ते तिला माहीत असलेल्या काव्य आणि इतिहास यातील प्रेमिकांच्या अवस्थेच्या वर्णनावरून. स्वप्नवासवदत्त नाटकातील ब्रह्मचारीही उदयनाचा शोक वर्णन करताना चक्रवाकाचा आणि अन्य प्रेमिकांचा काव्यनिबद्ध उल्लेख करतो. या उल्लेखाचा अर्थ असाच घेतला पाहिजे की काव्य, इतिहास, पुराण इत्यादींचा अभ्यास मग आणि शास्त्र यांच्या अभ्यासा बरोबरच होत असला पाहिजे. याशिवाय विशेष ध्यान घेण्यासारखी

गोष्ट अशी की, निसर्गाने शकुन्तलेला अलकार भेट दिल्यावर, अलकार वापरण्याचे वर्धी माहीत नसलेली प्रियवदा क्षणभर माघारते, पण लगेच म्हणते की, 'चित्रकर्माचे जे ज्ञान मज आहे त्याचा उपयोग करून मी तुज नटविते.' प्रियवदा आणि अनसूया याच्या या नैपुण्याबद्दल शकुन्तलेलाही खात्री आहे. या प्रसगाव शकुन्तलेच्या मैत्रिणी चित्रकलेत प्रवीण असल्याची साक्ष जशी मिळते तशी त्या प्रसाधनकलेमध्येही निपुण असल्याचे दिसून येते. मालविकाग्निमित्र नाटकातील बकुलावलिका अशीच प्रसाधनकलेत निपुण आहे, आणि ही विद्या किंवा कला आपण अग्निमित्राकडून शिकलो असे ती सागते. याचा अर्थ असा, असा दिसतो की मुलाच्याबरोबर मुली गुरूच्या आश्रमात शिकत असताना, साहित्य आणि शास्त्र यांच्या अभ्यासा-बरोबरच त्यांना उपयुक्त असे ललित आणि सौंदर्यानुकूल कलांचे शिक्षण मिळत असावे. राजपुत्र आणि राजकन्या याना सगीत, नृत्य, चित्र आणि अभिनय या कलांचे खास शिक्षण मिळत असे, आणि त्यासाठी त्या त्या कलातील निष्णात आचार्यांची खास नेमणूक राज-दरबारी होत असे, हे मालविकाग्निमित्र नाटकावरून तर स्पष्टच आहे. कालिदासाचा दुष्यन्त हा सगीताचा तज्ज्ञ आहे आणि स्वत: चित्र-कारही आहे. हे ललितकलांचे शिक्षण किंवा रसिक ज्ञान हा तत्कालीन शिक्षणाचा आणि संस्कृतीचा भाग होता असे दिसते. आणि असे असेल तर कालिदासाचे व्यक्तिमत्त्व नुसते शास्त्रसपन्नच नव्हते तर कलासपन्नही होते असे त्याच्या साहित्यावरून आपल्याला म्हणता येईल. कालिदासाच्या नाटकातले संगीत, नृत्य, चित्रकला यासंबंधीचे उल्लेख केवळ पुस्तकी वाटत नाहीत. 'मध्यमस्वरोत्था मायूरी मार्जना', 'शरयोनि अभिनय' हे संगीत आणि नृत्याभिनयविषयक उल्लेख, आणि शकुन्तलेच्या चित्राला दुष्यन्ताने वर्णिलेली पार्श्वभूमी, आणि चित्रफलकावर दुष्यन्ताचा अश्रुबिंदू पडल्यामुळे पुसून आलेल्या आणि

पसरलेल्या रंगाचा उल्लेख, अतिशय मर्मग्राही आहेत. कालिदासाने या वस्तू फार सूक्ष्मपणे न्याहाळल्या होत्या यात तर शंका नाहीच; पण अशीही शक्यता आहे की तो स्वतः या कलांमध्ये निपुण होता. इन्दुमतीबद्दल विलाप करताना अज ती 'प्रियशिष्या ललिते कलाविधौ' असल्याचे म्हणतो. उदयनाने वासवदत्तेला वीणावादनाचे पाठ प्रत्यक्ष दिल्याचा स्पष्ट निर्देश आहे तसा अजाच्या बाबतीत कुठेही दिसत नाही. मग हे वर्णन कवीच्या स्वानुभवातून तर आले नसेल? या उल्लेखाचा असा मानसशास्त्रीय अर्थ लाविला म्हणजे कालिदासाचे कलाप्रवण व्यक्तिमत्त्व प्रकाशित होते. याशिवाय आपल्या कौटुंबिक जीवनात अशीच एखादी प्रियशिष्या त्याची पत्नीही झाली असल्यास (किंवा पत्नी प्रियशिष्या झाली असल्यास), मानसशास्त्रदृष्ट्या तरी असंगत किंवा असमर्थनीय मुळीच ठरणार नाही.

कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वात विद्वत्ता आणि कलात्मता यांचे मीलन झालेले दिसते. कालिदासाच्या साहित्यनिर्मितीला या संगमाने एक वेगळेच सौंदर्य प्राप्त झाले आहे. शास्त्राभ्यासाने येणारे पांडित्य साहित्यनिर्मितीला उपयोगी पडत नाही याची जाणीव भवभूतीला एक नाटक लिहिल्यानंतर झाली. आणि तरीही त्याचे पांडित्य अकारण डोके वर काढतेच. 'प्रसन्नराघव'चा कर्ता जयदेव 'तर्ककर्कश' आणि 'कोमलकाव्यरचनाकार' दोन्हीही सव्यसाचित्वाने हाताळल्याची बढाई मारतो. पण लेखनात पांडित्य कुठे बोचू नये, आणि शास्त्रीय ज्ञानाच्या अभावी कला उथळ होऊ नये हे दोन्ही फार थोड्यांना साधते. कालिदासाच्या साहित्यनिर्मितीत मात्र पांडित्य फेसासारखे वर न तरंगता काव्यरसात विरघळून जाते; आणि त्याची कला भक्कम

[आ] कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वाचा दुसरा विशेष जो मला वाटतो तो म्हणजे त्याची सौंदर्यासक्त दृष्टी कवीच्या अंगी सौंदर्यदृष्टी असावीच लागते,–असते. आणि कालिदासाच्या साहित्यातील कलाविन्यास इतका मनोरम आहे, सहज अलंकार ल्यालेल्या त्याच्या शब्दकलेचे रूपही इतके सुंदर आहे, की सौंदर्यदृष्टी हा कालिदासाचा विशेष म्हणून म्हटल्यास ते उक्त वक्तव्याचे उदाहरण म्हणून वाटेल, स्पष्टाचे स्पष्टी-करण केल्यासारखे वाटेल. मला जे म्हणावयाचे आहे ते थोडे वेगळे आहे. चांगल्या कवीत आणि त्याच्या काव्यात जी सौंदर्यदृष्टी आपण गृहीत धरतो त्याहून वेगळी आणि उत्कट अशी दृष्टी मला अभिप्रेत आहे. मला वाटते की ही दृष्टी दोन तऱ्हेने प्रकट होते. एक, सौंदर्यपूर्ण वर्णनात भावनेच्या आणि कल्पनेच्या नेहमीच्या सौंदर्यानिराळे काही अकल्पित पण अचूक तपशील आल्याने. उदाहरणार्थ दुष्यन्त कण्वा-श्रमात येतो तेव्हा त्याला आश्रमाचे दिसणारे चित्र कालिदासाने वेचक शब्दांत रंगविले आहे. या वर्णनात आश्रमजीवनाचा परिचित रिवा सामान्य तपशील हुबेहूब आलेला आहेच परंतु कालिदासाची विशेष दृष्टी ज्या आणखी काही गोष्टी टिपते त्यात पक्ष्यांच्या घरट्यातून झाडाच्या बुंध्याशी सांडलेले धान्याचे बारीक कण आहेत; इंगुदी फळ फोडण्यासाठी घेतलेले आणि फळ फुटताना आलेल्या तेलाने माखलेले लहान गोटे आहेत; आणि पाणवठ्यावरून पाणी आणताना घडा टिपकून भिजलेल्या वल्कलातून ठिबकणाऱ्या जलबिंदूंच्या रेषांनी अंकित झालेल्या पायवाटा आहेत (शाकुंतल, १.१४.) हा नुसता सूक्ष्म अवलोकनाचा दर्शक नाही. अशा अवलोकनाला प्रवृत्त करणारी आणि विशेष अर्थ देणारी अशी जी सौंदर्यग्राहक वृत्ती तिचे हे फळ आहे असे मला वाटते. विक्रमोर्वशीय नाटकातील, राजवाड्यातील संध्याकाळच्या वर्णनात (३.२) दिवसाची पेटवून ती जागजागी ठेवीत जाणाऱ्या वृद्ध परिजनाचा उल्लेख असाच लक्षवेधी

पसरलेल्या रंगाचा स्टेरख, अतिशय मर्मग्राही आहेत. कालिदासाने या कला फार सूक्ष्मपणे निहाळल्या होत्या यात शंका नाहीच; पण अशीही शक्यता आहे की तो स्वतः या कलामध्ये निपुण होता. इन्दुमतीबद्दल विलाप करताना अज ती ' प्रियशिष्या ललिते कलाविधौ ' असल्याचे म्हणतो. उदयनाने वासवदत्तेला वीणावादनाचे पाठ प्रत्यक्ष दिल्याचा जसा निर्देश आहे तसा अजाच्या बाबतीत कुठेही दिसत नाही. मग हे वर्णन कवीच्या सत्तप्रवाहातून वर आले नसेल ? या उल्लेखाचा असा मानसशास्त्रीय अर्थ बसविला म्हणजे कालिदासाचे कलासंपन्न व्यक्तिमत्त्व प्रकाशित होते. याशिवाय आपल्या कौटुंबिक जीवनात अशीच एखादी प्रियशिष्या त्याची पत्नीही झाली असल्यास ( किंवा पत्नी प्रियशिष्या झाली असल्यास ), मानसशास्त्रदृष्ट्या तरी असंगत किंवा असंभवनीय मुळीच होणार नाही.

कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वात विद्वत्ता आणि कलात्मता यांचे मीलन झालेले दिसते. कालिदासाच्या साहित्यनिर्मितीला या संगमाने एक वेगळेच सौंदर्य प्राप्त झाले आहे. शास्त्राभ्यासाने येणारे पांडित्य साहित्यनिर्मितीला उपयोगी पडत नाही याची जाणीव भवभूतीला एक नाटक लिहिल्यानंतर झाली. आणि तरीही त्याचे पांडित्य अकारण डोके वर काढतेच. ' प्रसन्नराघवा 'चा कर्ता जयदेव ' कर्कशतर्क ' आणि ' कोमलकाव्यशैलकला ' दोन्हींही सव्यसाचित्वाने हाताळण्याची बढाई मारतो. पण लेखनात पांडित्य कुठे बोचू नये, आणि शास्त्रीय बैठकीच्या अभावी कला उथळ होऊ नये हे दोन्ही फार थोड्यांना साधते. कालिदासाच्या साहित्यनिर्मितीत मात्र पांडित्य फेसासारखे वर न तरंगता काव्यरसात विरघळून जाते; आणि त्याची कला भक्कम ज्ञानावर उभी असल्याने कधी पोरकट किंवा उथळ होत नाही. वैदग्ध्य आणि पांडित्य यांचा समतोल हे कालिदासाच्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वाचे एक विशेष लक्षण म्हणून म्हटले पाहिजे.

आहे. हिमालयाच्या उंचीवर वर्षामेघ आला असता तेथे राहणाऱ्या सुरयुवतींनी सहज हात उचावून आपल्या कंकणाच्या टोकांनी मेघाला छिद्रे पाडावीत आणि मेघाचे यन्त्रधारागृह ( Shower-bath ) बनवून त्याच्याखाली स्नान करावे, हे कालिदासाने मेघदूतात केलेले वर्णन ( पूर्वमेघ, ६४ ) जितकें अकल्पित तितकेंच हृदयाला गुदगुल्या करणारे आहे.

दुसरा प्रकार असा : ही सौंदर्यदृष्टी अगदी उत्स्फूर्त असते, आणि बरेच वेळा अचानक, नको तेथेही, प्रकट होते. ध्यानीमनी नसताना एखादे सुंदर दृश्य दिसावे आणि त्यामुळे आनंदाचा उद्गार एकाएकी मुखातून बाहेर पडावा हे कशाचे लक्षण आहे ? काही तरी रम्य दिसावे, अकल्पित गाण्याची लकेर कानावर पडावी, आणि त्यामुळे मनाला अकारण हुरहूर लागावी, ह्याचा अर्थ काय ? कालिदासाच्या दुष्यन्ताला हा अनुभव आला. वैखानसाच्या आमन्त्रणावरून कण्वाविषयीच्या आदरभावाने तो आश्रमात आला, जटाधारी आणि दाढीवाले तापस दिसावयाच्या ऐवजी, स्वप्रमाणानुरूप सेचन-घट कमरेवर तोलीत झाडांना पाणी घालणाऱ्या आश्रमबालिका त्याला दिसल्या, त्यांचे सहज सौंदर्य इतके विलक्षण होते की दुष्यन्ताच्या धराईत दृष्टीलाही वनलतांनी उद्यानलतांवर मात केल्याचे दिसले आणि ते त्याने मनोमनी कबूल केले. या बालिकांना पाहून ' अहो मधुरमासां दर्शनम् । ' हा दुष्यन्ताचा आनंदोद्गार या उत्स्फूर्त सौंदर्यदृष्टीचा द्योतक आहे. हंसपदिकेच्या गाण्याने तो असाच हेलावून गेला. आणि आपल्या हुरहुरीचे कारण पूर्वजन्मीच्या स्नेहात शोधू लागला ! दुष्यन्तच कशाला, नदीच्या काठी वाळूचे किल्ले रचण्यात स्वतःला हरवून गेलेली विद्याधरदारिका पाहून, अखिल सौंदर्याचे निधान अशी उर्वशी आपल्या शेजारीच आहे याचेही भान पुरूरव्याला उरले नाही ! अग्निमित्र तर एक सामान्य राजा; पण मालविकेच्या गोऱ्या नाजूक पावलावर रंगविलेली

अळित्याची लाल रेषा पाहून शिवाने गाळलेल्या मदनटमाला नवी तांबुस पालवी तर फुटली नाही ना, असे त्यालाही वाटले ! अर्नेस्ट रेमंड या रसिक टीकाकाराने आपल्या ' थ्रू लिटरेचर टु लाइफ् ' या पुस्तकात एका प्राध्यापकाची गोष्ट सांगितली आहे. एका सकाळी वर्गात शिकवीत असता त्याचे लक्ष सहज खिडकीच्या बाहेर गेले आणि तो ओरडला, ' Gentlemen, the Spring is outside ! ' आणि तो जो वर्गाच्या बाहेर पडला तो पुन्हा आलाच नाही ! ही वृत्ती, किंवा एखाद्या सुवासाने वेडावून जाण्याची, किंवा सतारीचे ' दिड्दा दिड्दा ' ऐकून हेलावून जाऊन मनाने दुसऱ्याच विश्वात प्रवेश करण्याची वृत्ती, पठित आणि शिक्षित सौंदर्यदृष्टीहून वेगळी आहे.

ही सौंदर्यदृष्टी आपाततः नसो तेथेही प्रकट होते. भिंतीला छिद्र पाडून आपल्या घरात चोर शिरला आणि त्याने मूल्यवान दागिने चोरून नेले हे कळल्यावरही, चारुदत्त त्या छिद्राची चित्राकृती निहाळण्यात आणि चोराचे शिल्पकौशल्य आस्वादण्यात दंग होऊन जातो ! कोणीही मनुष्य, अगदी प्रथित रसिक देखीलही, चारुदत्ताला म्हणेल : ही सौंदर्यनिरीक्षणाची वेळ नाही. ते सावकाश करता येईल. अगोदर चोराचे काही तरी करू या ! म्हणूनच तर ही सौंदर्यदृष्टी वेगळी म्हणावयाची. नाहीशी झालेली उर्वशी त्या संगमनीय मण्याने पुरूरव्याला परत मिळवून दिली आणि त्याला तो प्राणापलीकडे जपतो. तो मणी मांसाचा तुकडा समजून एका गिधाडाने उचलून नेल्यावर पुरूरवा अत्यंत अस्वस्थ होतो यात शंका नाही. पण त्या गिधाडावर बाण सोडण्याच्यापूर्वी त्याच्या सौंदर्यपूर्ण हालचाली पाहण्यात पुरूरवा दंग होऊन जातो. लाल मणी चोचीत धरून चक्राकार फिरणारा गृध्र लाल तेजाची वलये निर्माण करीत आहे. हातात जळती मशाल धरून ती गोलगोल फिरवावी म्हणजे जसे दृश्य दिसेल तसे पुरूरव्याला या प्रसंगी दिसते. लाल तेजाचा फुलोरा चोचीच्या समोर फुलला

असता लाल अशोकाच्या गुच्छाने दिशेच्या कानात कर्णभूषण घात-ल्याचा भास त्याला होतो. कृष्णवर्ण गिधाड आणि त्याच्या चोचीत दडलेला लाल मणी यानी पुरूरव्याला आठवण होते ती रात्रीच्या वेळी काळ्या ढगाच्या शेजारी असलेल्या मंगळाची! (विक्रमोर्वशीय, ५.२ ३-४)

अशी सौंदर्यदृष्टी वरवर वेडेपणाची वाटली तरी त्यात असंगती नसते. उर्वशीला पाहून ती, वेदाभ्यासजड आणि ज्याला जीवनाच्या भोगात कुठलाच रस नाही अशा नारायण ऋषीची निर्मिती असेल हे मान्य करायलाच पुरूरवा तयार नाही; कारण यात कार्य-कारणभावाचा सरळ विपर्यास आहे. म्हणूनच तो चंद्र, वसंत, किंवा मदन याच्यातून उर्वशी जन्माला आलेली असावी असे म्हणतो. शकुन्तलेचे अनुपम सौंदर्य पाहिल्यावर आणि तिच्या जन्माची हकीकत कळल्यावर दुष्यन्तालाही तार्किक समाधान लाभते, आणि लखलखणारी वीज पृथ्वीच्या पोटातून येणारच नाही, असे उद्गार तो काढतो. शकुन्तलेला निर्माण करताना ब्रह्मदेवाने नेहमीची निर्मिति प्रक्रिया बाजूला सारून एका स्त्रीचे चित्र फलका-वर अगोदर रेखाटले असावे आणि त्यात सुधारणा करीत करीत ते परिपूर्ण झाल्याची खात्री पटल्यावरच त्या चित्रात प्राण ओतून त्याला जिवंत केले असावे, असे दुष्यन्ताला मनापासून वाटते.

या सौंदर्यदृष्टीचा वेगळेपणा लक्षात घेतल्याशिवाय कालिदासाचे नायक नीट समजणार नाहीत. आणि त्याना निर्माण करणारा कालिदासही नीट समजणे कठीण आहे. या सौंदर्यदृष्टीचे सर्वव्यापी प्रणयभावनेशी एक निकटचे साहचर्य आहे. या दोहोतही स्वत:ला क्षणार्धात विसरून जाण्याची वृत्ती आहे. ही वृत्ती आणि त्यातून जन्माला येणारी सौंदर्यभावना कालिदासाच्या कलात्मक व्यक्तित्वाचा एक महत्त्वाचा विशेष आहे असे मला वाटते.

[ ६ ] कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वाचा तिसरा विशेष म्हणजे त्याची निसर्गविषयीची भावना. कालिदासाच्या साहित्यात निसर्गाला फार मोठे आणि विशिष्ट स्थान आहे. त्याचे ऋतुसंहार काव्य म्हणजे निसर्गाचा एक जीवनस्तव आहे. पूर्वमेघातील निसर्गाच्या विविध दृश्यामधून यक्षाची विरहभावना एखाद्या रुपेरी रेषेसारखी मधूनच चमकते, तर उत्तरमेघात यक्षपत्नीच्या विरहमूर्तीला निसर्गपटाची सोनेरी चौकट लाभलेली आहे. कुमारसंभवात आणि रघुवंशात नद्या, पर्वत, लता, वृक्ष, पशुपक्षी, यांच्या सुरेख चित्रणाबरोबरच वसंताचे वैभवही फुलून आले आहे. कालिदासाच्या नाटकात (आणि विशेषतः शाकुन्तलात) निसर्गाचे रूप तर आपल्याला दिसतेच, पण शाकुन्तलात निसर्ग एक नाटकीय पात्रच आहे की काय असे वाटते. निसर्गवर्णनाला पुढील संस्कृत साहित्यात जो एक साचेबंदपणा आणि यांत्रिकपणा आला तो कालिदासाच्या वर्णनात दिसत नाही. निसर्गाचे दर्शन कल्पनेने किंवा पढिकपणे घेण्याच्याऐवजी कालिदास स्वतःच्या नयनांनी निसर्गाच्या निकट होता असे वाटते. मेघदूतात रामटेक ते अलका हा प्रवासमार्ग रंगविणारा, रघूच्या दिग्विजयाच्या निमित्ताने भारताच्या चारही दिशा फिरवून आणणारा, आणि पुष्पक विमानात बसून भारताच्या दक्षिण टोकापासून उत्तरेस अयोध्येकडे येत असताना रामाने दाखविलेले भारताच्या सुफला, सुजला, सुन्दरश्यामल भूमीचे दर्शन सीतेप्रमाणे आपल्याही प्रत्ययास आणून देणारा कालिदास आपल्या महालाच्या गवाक्षातूनच निसर्ग निहाळीत होता हे कसे पटावे? कालिदासाने स्वतः प्रवास केला असावा असे वाटते ते त्यामुळेच. आणि हे जरी खरे नसले तरी शेक्सपिअरप्रमाणे ऐकलेले सारे सार मन-में घट्ट रुजून ठेवण्याची दृष्टी आणि शक्ती त्याला होती हे तरी मान्य करावेच लागेल. कालिदासाची बहुश्रुतता निर्विवाद आहे; पण त्याचे अवलोकनही अचूक, मार्मिक आणि सौंदर्यग्राही आहे यात शंका नाही.

कालिदासाच्या निसर्गवर्णनाचे तीन चार वेगळे थर मला स्पष्ट दिसतात. रसिक अवलोकनाने आलेली निसर्गाची वस्तुनिष्ठ वर्णने त्याच्या साहित्यात जागजागी आहेत. परंतु निसर्ग ही नुसती निरखण्याची वस्तू नसून निसर्गाच्या विविध भावाचे मानवी भावनांशी संबंध आहेत याची जाणीव झाली म्हणजे कवीच्या निसर्गवर्णनात फरक पडतो. ऋतुसंहारातील वर्णनाप्रमाणे कवी हे भावनासाहचर्य रेखांकित करतो किंवा उपमा–उत्प्रेक्षादी अलंकाराच्या मिषाने त्याची जोड घालून देतो. मग मानवी भावनांचे प्रतिबिंब निसर्गात दिसते किंवा निसर्गाच्या स्थिरयतरात मानवी भावाचे प्रत्यंतर येऊ लागते. रतिविलाप, अजविलाप, पुरूरव्याचा उर्वशीचा शोध, शकुन्तलेचे आश्रमातून प्रयाण किंवा यक्षाने शब्दांकित केलेले क्षण, या प्रसंगामध्ये हे निसर्ग–मानवाचे साहचर्य आपल्याला दिसून येते. या चित्तवृत्तीत प्रेयसीच्या अस्तित्वाच्या खाणाखुणा निसर्गात स्पष्ट दिसल्या तर नवल नाही. पुरूरव्याला निसर्गानेच राजोपचार केला आहे असे वाटावे, वसिष्ठाश्रमाकडे निघालेल्या दिलीपाचेही निसर्गाने राजयादी स्वागत करावे, किंवा पुरूरव्याला हंसामध्ये, कमलामध्ये किंवा नदीमध्ये उर्वशीची प्रतिमा दिसावी, याचा अर्थच असा की निसर्ग आणि मानव याचे जीवन एकमेकात मिसळून गेले आहे. मीलनाची ही खूण पटली म्हणजे मानवाने निसर्गाचे अनुकरण केले असे वाटण्याऐवजी निसर्गच मानवाला अनुसरतो असे वाटू लागते. उर्वशीची डौलदार चाल हंसाने तिच्यापासून चोरली या पुरूरव्याच्या काव्यमय आरोपाचा अर्थ असाच लागला पाहिजे. कवीचे मन अशा तादात्म्याच्या, ऐक्याच्या अनुभूतीशी आले म्हणजे निसर्गाचे स्वत:चे जिवंत व्यक्तिमत्त्व त्याच्या प्रत्ययास येणे ही पुढची पण सहज पायरी आहे. शाकुन्तलाच्या चौथ्या अंकातील निसर्ग अशी एक जिवंत व्यक्ती आहे. म्हणूनच शकुन्तला सासरी जायला निघते तेव्हा वनदेवता

तिला अलंकाराचा घरचा आहेर करतात; कोकिळा कुहू आवाज करून प्रस्थानाची वेळ सुचविते; वारा अनुकूल होऊन वाहू लागतो; आणि शकुन्तला प्रस्थानासाठी पाऊल प्रत्यक्ष उचलते त्या वेळी, प्रसंगाचे गांभीर्य समजण्याचे वयच नसलेली आणि आपल्या खाण्यापिण्यात दंग असणारी बालके काही तरी विचित्र जाणून तोंडातला घास चावायचे विसरतात, तशा मृगी तोंडातला घास ओघळू देतात; खेळात रमणारी थोडी मोठी मुले खेळ थांबवून घर सोडून निघालेल्या नववधूकडे जसे भावावून पाहतील तसे मोर आपले नर्तन एकाएकी थांबवतात; आणि मुलीच्या विरहाने कातर झालेल्या घरातल्या जाणत्या स्त्रिया आपले दुःख दिसू नये अशी काळजी घेत बाजूला उभे राहून मूक अश्रू ढाळतील तशा रस्त्याच्या कडेवरील लता गळणाऱ्या पानांच्या मिषाने मूक अश्रू ढाळतात ! ( शाकुन्तल, ४. ५, १०, ११, १२ पाहा ) वस्तुनिष्ठ वर्णनापासून निसर्गाला जिवंत व्यक्तिमत्त्व बहाल करण्यापर्यंत कालिदासाची दृष्टी विकसित झालेली त्याच्या साहित्यात दिसते. निसर्गाचे हे वर्णन कालिदासाच्या साहित्याचा आणि कलेचा एक अभिजात विशेष आहे. म्हणूनच ही निसर्गभावना कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वाचेच एक लक्षण आहे, असे म्हणावेसे वाटते.

[ ६ ] कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वाचा चौथा विशेष म्हणजे जीवनाकडे आनंदी आणि खेळकर वृत्तीने पाहण्याची त्याची दृष्टी. ही दृष्टी मानवी जीवनाचा, प्रेमाचा, कौटुंबिक जीवनाचा आनंद त्याने जे वर्णन केला आहे त्यात तर दिसतेच; परंतु त्याच्या खेळकर वृत्तीचे खरे प्रतिबिंब म्हणजे त्याचा विनोदी स्वभाव. विद्वानाला आणि कलावन्तालाही विनोदाचे वावडे असू शकते हे लक्षात घेतले म्हणजे कालिदासाच्या या विशेषाची मातबरी कळून येते. संस्कृत साहित्यातील विनोदाचे नेहमीचे वाहन म्हणजे

विदूषकाचे पात्र. कालिदासाच्या नाटकात तो आहेच. विदूषकाच्या धांदाडपणाचे आणि मूर्खपणाचे विनोद पुढील नाट्यसाहित्यात सांकेतिक आणि निर्जीव झाल्याचे आपल्याला माहित आहेच. परंतु कालिदासाने जेव्हा ही विनोदाची प्रथा सुरू केली तेव्हा तिला असा सांकेतिकपणा आला होता की काय याविषयी शंका वाटते. परंतु कालिदासाचा विनोद सांकेतिकपणातच संपलेला नाही. कौटुंबिक जिव्हाळ्याच्या प्रसंगामधून किंवा काही वेळेस अगदी अनपेक्षितपणे विनोद प्रकट होतो असा विनोद अतिशय हृद्य असतो. तो एखाद्या व्यक्तीच्याच मालकीचा नसतो, तर जीवनाकडे खेळकरपणाने पाहणाऱ्या कोणाही व्यक्तीच्या मुखातून, एखाद्या प्रसंगातील मौज ध्यानी येताच, तो आपोआप प्रकट होतो. चोरीच्या आरोपातून सुटका होऊन वर दुष्यन्ताकडून पारितोषिक मिळाल्यावर, दुष्यन्ताच्या शिपायाच्या धाकदपटशाने घाबरलेला धीवर मनाने एकदम मोकळा होतो, आणि आपल्या मत्स्यमारीच्या धंद्याची कुटाळकी करणाऱ्या शिपायांना गालातल्या गालात हसत विचारतो, 'सरकार, आता माझा धंदा कसा वाटतो तुम्हाला ?' धीवराला सुळावर द्यायला किंवा गिधाडापुढे फेकायला निघालेल्या या शिपायांनीही, पारितोषिकाचा अर्धा वाटा मिळण्याची आशा दिसताच धीवराला मिठी मारावी आणि या नव्या मैत्रीचा आनंद घोषित करण्यासाठी गुत्त्याची वाट धरावी, या प्रसंगातील मौज कोणालाही जाणवल्यावाचून राहणार नाही. शाकुन्तलातील प्रियंवदा तर नावाप्रमाणेच बोलण्यातही गाठ घट्ट दिल्याने कंचुकी तटतटल्याची तक्रार शकुन्तलेने करताच ती म्हणते, 'मला कशाला दोष देतेस ? तुझ्या यौवनाला दे.' त्याच आम्राकडे पाहण्यात गढून गेलेल्या शकुन्तलेला पाहून ती अनसूयेला म्हणते, 'शकुन्तला एवढा कसला विचार करते आहे माहित आहे ? लतेला जसा अनुरूप जोडीदार मिळाला, तसा आपल्याला केव्हा मिळेल याचं चिंतन चालू आहे

बाईसाहेबांच!' आणि हीच प्रियंवदा दुष्यन्ताने शकुन्तलेला ऋणातून मुक्त करण्यासाठी अंगठी देऊ केल्यावर, तो राजा दुष्यन्तच आहे हे मनातल्या मनात ओळखून शकुन्तलेस म्हणते, 'सई, यांनी तुझी ऋणातून सुटका केली...दुष्यन्तमहाराजांनीच केली असेही म्हणायला हरकत नाही!' प्रियंवदेच्या चतुरपणामधून राजा दुष्यन्तही मुक्त नाही हाच याचा अर्थ.

असा हृद्य विनोद काही वेळेस नकळत, अजाणता प्रकट होतो. पुत्राची ओळख पटून दुष्यन्त त्याला जवळ घेऊ पाहतो. पण एकाएकी सर्वदमन मात्र शकुन्तलेजवळ तक्रार करतो, 'आई, हा बघ ग, कोण मला मुलगा म्हणून मिठी मारतो आहे!' तो त्याचा पिता आहे असे सांगितल्यावरही सर्वदमन फणकाऱ्याने म्हणतो, 'माझा पिता दुष्यन्त आहे, तू नाहीस.' या प्रसंगातील नाट्यपूर्ण आणि अजाण विनोद कोणाला मोहून टाकणार नाही?

कालिदासाच्या विदूषकांनी राजाची जी थट्टा केली आहे त्यातील विनोद आरशासारखा नुसता हसविणार नाही; त्यातील खोचकपणा, उपहास आणि परिहास तत्कालीन राजजीवनावर झगझगीत प्रकाशाचा झोत टाकतात. विदूषकी टोपी चढवून राजाची भंबेरी उडविणारे हे विदूषक म्हणजे जीवनाचे खेळकर भाष्यकारच होत.

परंतु दुसऱ्याची थट्टा सहज करता येते. स्वतःचीच थट्टा स्वतः करणे याला खरी खेळकर वृत्ती आणि मनाचा मोठेपणा आवश्यक आहे. कालिदासात ही वृत्ती होती असे मला वाटते. अर्थात स्वतःविषयी केलेल्या परिहासाच मुळात साहित्यात नाही; त्यामुळे त्याच्या विनोदांना सबंध प्रत्यक्ष लेखकाशी जोडून दाखविणे कठीण आहे. परंतु या वृत्तीचे अवशेष सर्वत्र कालिदासाच्या साहित्यात आहेत. कालिदासाचे विदूषक इतरांची थट्टा करताना स्वतःचीही

करायला चुकत नाहीत. कालिदासाच्या गौतमाला किंवा माणवकाला आपण माकडासारखे दिसतो हे सांगायला काहीही संकोच वाटत नाही. माणवक पुरूरव्याला चक्क विचारतो, 'मी जसा कुरूपपणात अद्वितीय आहे तशीच उर्वशी रूपाने अद्वितीय आहे काय?' परंतु स्वतःची थट्टा करण्याचे एक असाधारण उदाहरण कुमारसंभवातील शिवामध्ये दिसून येते. पार्वतीची परीक्षा पाहण्यासाठी बटुवेषाने आलेल्या हा शिव, शिवाची जी थट्टा पार्वतीच्या समोर करतो त्यातील परिहासाला तोड नाही! शिव हे दैवत; कालिदासाचे अत्यंत प्रिय दैवत; हे लक्षात ठेवून या परिहासाकडे पाहिले म्हणजे कालिदास स्वतःचीही थट्टा करायला कधी चुकला नसता याबद्दल शंका उरत नाही. ही विनोदी वृत्ती आणि तिच्यात दडलेला खेळकरपणा आणि मनाचे औदार्य कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वाचे विशेष ठरतात ते यामुळेच.

## [ ५ ]

कालिदासाचे साहित्य अभ्यासल्यावर त्याच्या व्यक्तिमत्त्वाची जी प्रतिमा मनासमोर उभी राहते ती अशी संपन्न, सौंदर्यासक्त, जीवनाचा आनंद घेणारी, खेळकर. पण जीवनातील भीषणता, कटुता कालिदासाने पाहण्याचे टाळले आहे, असेही त्याच्या साहित्यावरून वाटते. कदाचित संपन्न जीवन, राजाश्रय इत्यादी गोष्टींमुळे जीवनाचे रौद्र रूप त्याच्या अनुभवाला आलेही नसेल. किंवा असाही संभव आहे की विशिष्ट मनोवृत्तीमुळे त्याने या रूपाकडे दुर्लक्ष केले असेल.

कालिदासाच्या काव्यात नद्या, पर्वत इत्यादींचे वर्णन आहे; पण त्याला केवळ रम्यता आलेली आहे. पर्वत हा मेघदूतातील मेघाच्या विसाव्याचे एक ठिकाण; आणि मेघ त्यावर विसावला म्हणजे

समुद्रवसना उर्वीचे 'पर्वतस्तनमण्डला' हे रूप साकार होते. नदी उर्वशीचे रूप घेते : जलप्रवाहावर कलरव करीत आंदोलणारी विहगश्रेणी ही तिची मेखला, आणि मधूनच तरंगत जाणारा फेस म्हणजे सरभाने शिथिल झालेले वस्त्र. नदीचे हे रूप मेघदूतातही दिसते. मात्र नदीवर वाकलेली वेळूची फांदी आणि तिला अडकून गेला झालेला फेस ह्ये हात आणि हाताने खेचलेले वस्त्र झाले आहेत. ह्या प्रतिमा प्रणयव्याकुल मनाने रचिलेल्या आहेत हे खरे. पण हा मुद्दा लक्षात घेऊनही कवीच्या मनाला निसर्गाच्या सौम्य आणि मृदु रूपाचाच मोह आहे, याविषयी शंका वाटण्याचे कारण नाही. कुमारसंभवातील हिमालयाच्या वर्णनात आरंभ्या मनावर जो संस्कार उमटतो तो दिव्य आणि अद्भुत रूपाचा. हिमालयाचे उत्तुंग पहाड, त्याची भव्यता, छाती दडपून टाकणारा त्याचा विस्तार, आकाशाच्या कक्षेत घुसलेली त्याची हिमाच्छादित शिखरे : अशा दर्शनाने चित्त थरारून जाण्याच्या ऐवजी, हिमालयाचे 'देवतात्म' आणि 'अनन्तरत्नप्रभव' असे रूपच आरंभ्या मनावर जादू करून जाते. याच्या उलट भव-भूतीला भीषण प्रकार दिसतात; साध्या नद्यांच्या संगमातही पर्वतप्राय उसळणाऱ्या लाटा त्याची नजर वेधतात, आणि एकमेकांवर आदळणाऱ्या जलस्त्रावातून निनादणारे रौद्र संगीत त्याला ऐकू येते.

कालिदासाने रघूचा दिग्विजय वर्णन केला आहे, दशरथाच्या शिकारीचे वर्णन केले आहे. पण रघूच्या दिग्विजयाला विहारयात्रेचे रम्यत्व आले आहे; आणि दशरथाला तर शिकारा उभारलेले मोर पाहून चित्रविचित्र फुले माळलेल्या, रतिविलासात मोकळा झालेला केशपाशाचा केशसंभार आठवतो, आणि हरिणीचे डोळे पाहून ती हरिणाक्षीच त्याच्या मनासमोर येते. रघुवंशासारख्या वीररसाला अनुकूल विषय घेऊनही, कालिदासाला वीरश्रीचा उठाव करता आला नाही. भवभूती मात्र लव चन्द्रकेतूच्या युद्धातही आकाशपाताळ एक करून

पृथ्वीवर प्रत्ययाची दया निर्माण करतो.

मालतीमाधव नाटकातील भवभूतीने केलेले स्मशानाचे आणि चामुंडेचे वर्णन क्षणभर थरकाप उडवून देते. अघोरघंटाच्या उद्योगात भक्तिभाव आणि रौद्ररस एकमेकामध्ये मिसळून गेले आहेत. उज्जयिनीच्या महाकाल मंदिरातील सायंपूजेचे वर्णन कालिदासही करतो. त्यात शिवाच्या तांडवाचा उल्लेख आहे; पण रौद्ररूप शिवाच्या शेजारी भीतीने डोळे मिटून घेणाऱ्या भवानीची मूर्ती रेखायला कालिदास विसरत नाही.

भवभूतीने वाल्मीकीच्या आश्रमातील बटूंचे चित्र आपल्या उत्तररामचरितामध्ये रंगविले आहे. हे विद्यार्थी आपल्या खाजगी बोलण्यात नवागत वसिष्ठऋषींची थट्टा करतात; आपल्या गुरुजींनी सादर केलेल्या सत्कारविधीबद्दल तार्किक चर्चा करतात; अनध्यायाच्या दिवशी आपल्या खेळण्या बागडण्याने आश्रमात दंगल उडवून देतात; 'घोडा' नामक कधी न पाहिलेला प्राणी पाहायला मोठ्या कुतूहलाने येऊन त्याच्याबद्दल चर्चा करितात; आणि सशस्त्र शिपायाच्या रागा पाहून भीतीने हरणासारख्या उड्या मारीत पटापट पसार होतात. कालिदासाच्या शाकुंतलातही आश्रमाचे वर्णन आहे : पण येथे उद्योगरत तापस आहेत; शाद्वलावर हिंडणारी विश्वस्त हरिणे आहेत, यज्ञकुंडातून आज्यधूम निघत आहे; पाणवठ्याच्या वाटा जलरेषेने अंकित आहेत; झाडांच्या फांद्यावरून ओली वल्कले लोंबत आहेत; क्वचित कुठे झाडाच्या बुंध्याशी घरट्यातून ओघळलेले नीवारधान्याचे कण आहेत, किंवा इंगुदी तेलाने माखलेले गोटे दिसत येत आहेत. वृक्षांना पाणी घालताना बाल्किंच्या थट्टामस्करीचा जो काही आवाज ऐकू येईल किंवा मन्त्रघोष कानावर पडतील तेवढाच आवाज नेहमीचा. दुष्यन्ताच्या सैन्यातील घोड्याच्या टापांनी उधळलेली धूळ, किंवा रथाला पाहून बुजलेल्या हत्तीने माजविलेली दंगल, या योगायोगाने केव्हा तरी एकदाच घडणाऱ्या गोष्टी.

येथील शिष्य 'गुरुजन गुरुशिष्य' आहेत. एकंदरीत, 'शान्त-निदमाश्रमपदम्' हेच खरे.

या तुलनेतून कोणाही कवीचा कमकुवतपणा सुचवायचा नाही. जीवनाकडे पाहण्याची दृष्टी आणि मनोवृत्ती यासंबंधीत भिन्नता तेवढी अभिप्रेत आहे.

शकुन्तलेची प्रतिमा रेखाटल्यावर त्या चित्राला योग्य अशा पार्श्वभूमीचा तपशील सांगताना दुष्यन्त म्हणतो :

> " मी येथे मालिनी नदी रेखणार आहे. तिच्या किनाऱ्यावरील रेतीत हंसाचे जोडपे एकमेकांना रेलून बसलेले दाखवायचे; सभोवती हिमालयाचा पावन टप; त्याच्या उतारावर हरिणे बसलेली असतील. आणि मग एका झाडाच्या फांदीवरुन वल्कले लोंबत आहेत, आणि त्या झाडाच्या खाली कृष्णमृगाच्या शिंगावर आपला डावा डोळा घाशीत मृगी उभी आहे, असे दृश्य निर्माण करण्याची माझी इच्छा आहे." ( शाकुन्तल, ६.१७ )

दुष्यन्ताची चित्रकर्तृत्वाची ही आवड कालिदासाच्याच मनोवृत्तीची निदर्शक आहे, असे वाटते. या वर्णनात कालिदासाची रसिक, कलासक्त, सौंदर्यग्राही वृत्ती दिसतेच, पण हंसमिथुन आणि मृग-मृगी या जोडप्यांचा परस्पर विश्वासाने भरलेला, अबोल, मुग्ध प्रणयही येथे आहे; मालिनी नदी आणि हिमालय यांच्या ध्यानाने पावित्र्य आणि भव्यता यांचा प्रत्यय आहे, आणि त्याचबरोबर अगाध, नीरव, जीवन-यात्री शान्तीचाही साक्षात्कार आहे. मृगी काळविटाच्या शिंगाच्या टोकावर आपला डोळा खाजवीत आहे, काळविटाची मान थोडी जरी हालली तरी मृगीचा डोळा फुटून जाईल ..कदाचित तिच्या जीवावरच धोका होईल. पण असे काहीच या चित्रात होत नाही. दोघांच्याही मनात भय नाही; वातावरणातही भयाचा अचानक उद्रेक घडेल असे

काही नाही. या जोडप्याचे विश्व परस्पर विश्वासाने आणि शान्तीने भरलेले आहे.

पावित्र्य आणि दिव्यत्व यांची पाठराखणी; परस्पर विश्वासाने मोहरून येणारी प्रीती; आणि संथपणे रेशमी वस्त्राप्रमाणे लपेटणारी नीरव शान्ती : अशी कालिदासाचीही जीवनाची आवड असावी. सळसळ, खळबळ, द्वंद्व त्याला नको आहेत.

कालिदासाच्या व्यक्तिमत्त्वाचा हाही विशेषच म्हटला पाहिजे. आणि तो त्याच्या कलात्मक व्यक्तिमत्त्वाची मर्यादा पण दाखविते.

● ● ●

# २

# विचारदर्शन

**(१) कालाचे अनुसंधान**

राजकीय दृष्ट्या – गुन-वावाटवाचा काळ
वैचारिक दृष्ट्या – बुद्धाच्या प्रसारानंतरची संक्रमणावस्था
अपभ्रंशाचे साहित्य व तत्त्वप्रचार
तत्कालीन गरज – वैदिक विचारधारेला स्थिरता
[illegible] साहित्य अप्रत्यक्षपणे उपयोगी
[illegible] विषमतेची जाणीव नाही, कट्टरी नाही
वरवरची भूमिका

**(२) धार्मिक विचार**

ब्राह्मणधर्माचे पुनरुत्थान    आचारप्रधान धर्म,
यज्ञाचे आकर्षण
नव्या देवता    त्रिमूर्तींची कल्पना,
शिवाबद्दल आवड.
ईश्वराचे सगुण रूप    गीतेतील विचारांचे प्रतिबिंब
पूर्वजन्म, पुनर्जन्म
भक्ति, योग.

(३) राजकीय विचार :

राजशाही हे शासनाचे रूप. मनाने राजनिष्ठ.
शाकुन्तलातील दोन विरोधी चित्रे.
आदर्श राजावरील विश्वास, श्रद्धा
अनियंत्रित राजसत्तेला अंकुश : कायदा करण्याचा अधिकार
ऋषीमुनींकडे. मंत्रिमंडळाचा सल्ला. तरुण राजपुत्राचे शिक्षण.
कालिदासाचा भर नैतिक मूल्यावर.
प्रजानुरञ्जन, प्रजेविषयी पित्याची भावना ;
कर घेण्यात दृष्टी ; संयमी व समर्पित जीवनाचा आदर्श.

(४) सामाजिक विचार :

चातुर्वर्ण्याची स्वीकृती. गुणकर्मविभागाचा अर्थ.
वर्णधर्माचे पालन ही शासनाची जबाबदारी.
आश्रमधर्माचे तत्त्व रघुराजाचा आदर्श.
गृहस्थाश्रमाचे श्रेष्ठत्व – संतानाचा धार्मिक अर्थ.
इंद्रियनिग्रह व संयम याचे महत्त्व.

(५) विवाह-संबंध

स्त्रीचे सामाजिक स्थान दुय्यम.
भवभूतीची जाणीव व सहानुभूती.
कालिदासाने स्वीकारलेली चौकट.

(६) शैक्षणिक विचार .

शिक्षण ही शासनाची जबाबदारी.
समानविद्य आचार्यांची स्पर्धा.
ज्ञानाचा व्यापार करणारे व्यापारी.
ज्ञानाची कसोटी.
आदर्श शिक्षक म्हणजे काय ?
शिष्याकडून अपेक्षा.
आजचा संदर्भ.

(७) कलेविषयी विचार :

रसग्रहणाचे तत्त्व सूचित.
शब्दार्थांचे मधुर स्वरूप
नाट्यासंबंधी कल्पना व भूमिका.
प्रयोगक्षमतेचे महत्त्व.
विज्ञानाचा परितोष : साहित्य हे निरंतरही.

(८) संकलित चित्र :

आहे ते स्वीकारण्याची वृत्ती.
ही भूमिका पराभूताची नाही — आदर्शाची कल्पना.
जीवनाचा परिपूर्णतेने उपभोग : कलेला, दर्शनात्मक प्रवृत्तीला
आवश्यक अशी भूमिका

## [ १ ]

कालिदासाच्या साहित्यसंपदेत जीवनाच्या विविध अंगांविषयी जे विचार कळत-नकळत प्रकट झालेले आहेत त्यांचे दर्शन येथे घ्यावयाचे आहे. काही विचार हे परम सत्यासारखे असू शकतात. ते एका विशिष्ट काळी प्रकट झाले असले तरी त्यांची यथार्थता आणि मूल्ये कालनिरपेक्ष असू शकतात. काही विचार काळाचा संदर्भ नीट लक्षात घेतल्याशिवाय ग्रहण करणे कठीण असते. कालिदासाचा काळ निश्चित नाही, हे आपण जाणतोच. परंतु इ. स. चे तिसरे-चवथे शतक हा बहुतेक विद्वानांना मान्य असलेला काळ कालिदासाचा काळ म्हणून मानावयास हरकत नाही. हे काळाचे अनुसंधान घेतले म्हणजे तत्कालीन भारताचे धर्मेतर जीवनाचे चित्र थोडेसे स्पष्ट होऊ लागते. हा काळ म्हणजे गुप्त-वाकाटकांचा काळ. उत्तर व मध्य भारतावर गुप्त व वाकाटक राजवंशाचा अंमल या वेळी होता असे इतिहासावरून दिसते. राजकीय दृष्ट्या लोकजीवनात फारसा फरक झालेला नसावा; कारण, एकंदरीत राजसत्तेची सत्ता हा प्राचीन भारताच्या इतिहासाचा एक अविभाज्य भाग आहे. राजसत्तेची किंवा राजाची गादी नष्ट होत असली तरी, राजकारणाच्या दृष्टीने विचार केल्यास, राजशाहीला लोक सरावलेले होते असेच म्हटले पाहिजे. • •

परंतु धर्म, तत्त्वज्ञान इत्यादी अंगांनी समाज-जीवनाचा विचार

करू लागलो म्हणजे स्थित्यंतराची कल्पना येऊ लागते समाजजीवनात आमूलाग्र बदल घडवून आणण्याचे सामर्थ्य धर्म आणि तत्त्वज्ञान यांच्यामध्ये आहे असे कोणत्याही प्राचीन इतिहासावरून आपल्याला दिसून येते. असा बदल घडत असल्याची खूण या कालखंडात आहे; आणि त्याचे नक्कल प्रतिबिंब कालिदासाच्या साहित्यात पडले असावे असे वाटते

वेदोपनिषदे, गीता, रामायण–महाभारत इत्यादी मातबर रचना येथवरच झालेली होती. उपनिषदांमधून परिणत झालेले जीवनविषयक तत्त्वज्ञान प्रसारित झालेले होते. दार्शनिक विचाराच्या कक्षा रुंदावून, हे सर्व ज्ञान सूत्रबद्ध करण्याचा खटाटोप सुरू झाला होता; आणि सनमय विचाराचा ऊहापोह करण्याची बौद्धिक जबाबदारी विवेचकांनी उचललेली होती. याचा अर्थ असा की, सूत्र आणि विवेचक प्रथाची रचना वाढीस लागून तात्त्विक विचाराचे क्षेत्र व्यापक होऊ लागले होते.

वस्तुत. वेदकालापासून वाढीला लागलेले धर्मविषयक तत्त्वज्ञान स्थिर व्हावयाला हरकत नव्हती, इतका कालाचा प्रवाह पुढे सरकलेला होता. परंतु ही स्थिरता एकदम किंवा आपाततः न येण्याला अस्थिर राजकीय जीवन हे जसे एक कारण म्हणता येईल, तसेच दुसरे आणि कदाचित अधिक महत्त्वाचे कारण म्हणजे जैन व बौद्ध धर्मांचा उदय व प्रभाव हे म्हटले पाहिजे. विशेषतः बुद्धाच्या विचारसरणीचा फार खोलवर परिणाम काही प्रज्ञावान लोकांच्या मनावर आणि एकदरीत समाजमानसावर झालेला होता यात शंका नाही. इ. स. पूर्व पहिले शतक व इ. स. चे पहिले–दुसरे शतक या कालखंडात काही उत्तर-भारतीय राज्यकर्त्यांनी बुद्धधर्माचा स्वीकार केल्यामुळे, या धार्मिक प्रभावाला सत्तेची धडकही आलेली होती. अशा रीतीने, प्राचीन

काळापासून चालत आलेला वैदिक धर्म आणि बुद्धाच्या विचारसरणीने त्याला पुन्हा पुन्हा मिळणारे धक्के, अशा एका संक्रमणकाळाचे हे चित्र आहे. या कालखंडाशी कालिदास निगडित असावा असे वाटते. कालिदासाच्या अगोदर होऊन गेलेला एक बौद्ध दार्शनिक अश्वघोष (इ. स. पहिले शतक) याने तात्त्विक ग्रंथरचना तर केलीच; पण 'बुद्धचरित', 'सौन्दरनन्द' ही संस्कृत महाकाव्ये रचून, बुद्धाचे जीवन व तत्त्वज्ञान काव्याच्या ललित व चित्त आकृष्ट करणाऱ्या माध्यमाच्या द्वारे सामान्य लोकापर्यंत नेऊन भिडविण्याची सोयही त्याने करून ठेवली. या दृष्टीने प्राचीन धर्माचा व तत्त्वज्ञानाचा पाठपुरावा कोणी तरी आपल्या साहित्यातून करावा अशी एक निकड सामाजिक जीवनातच उत्पन्न झाली असल्यास ते असंभवनीय नाही.

कालिदासाच्या साहित्याने ही निकड अप्रत्यक्षपणे भागविली, असे आपण आज म्हणू शकू : 'अप्रत्यक्षपणे' असे जे मी म्हटले ते दोन अर्थांनी : अश्वघोषाप्रमाणे विशिष्ट धार्मिक तत्त्वज्ञान प्रतिपादन करण्यासाठी कालिदासाने कोणतीही ग्रंथरचना केली नाही. कालिदासाचे 'शाकुन्तल' हे बौद्धधर्माला ब्राह्मण संस्कृतीचे उत्तर होय, अशा आशयाचे मत अतिरेकी आहे, अकारण दिशाभूल करणारे आहे. कालिदास त्या अर्थाने दार्शनिक नाही, आग्रही नाही. एखाद्या विचाराचे खंडन-मंडन करणे तर राहोच, पण स्वीकृत धर्मविचारात एखादा दोष आढळल्यास त्यावर बोट ठेवण्याचे कार्यही कालिदासाने केले नाही. शूद्र शंबूकाने तपश्चर्या आरंभली; शूद्राला हा वेदोक्त अधिकार नाही; त्यामुळे एका ब्राह्मणपुत्राचा अकाली मृत्यू घडून आला; रामाकडे हे गाऱ्हाणे येताच रामाने शंबूकाचा शोध पंचवटीत जाऊन लावला व त्याचा शिरच्छेद केला. हा प्रसंग कालिदासाच्या रघुवंशात आहे आणि भवभूतीच्या उत्तररामचरित नाटकातही आहे. कालिदासाने हा प्रसंग विनाकटाक्ष उल्लेखिला आहे. पण भवभूति

मात्र, अस्सल सोमयागी ऋत्विज ब्राह्मणकुळातच असूनही, या मानसिक अन्यायाने हेलावून गेला आहे; भवभूतीचा राम शंबूकाचा शिरच्छेद करतो तो 'वत्सवधा', मनोमनी स्वतःचा निर्भर्त्सना करून करून! स्वीकृत धर्मातील अशा सामाजिक उणीवांनी किंवा दोषांनी कालिदासाला धक्का बसल्याचे दिसत नाही. कालिदासाने प्रचलित, मान्य, धार्मिक तत्त्वज्ञानाचा उद्गार मात्र आपल्या काव्यनाटकांतून केला आहे. हे लक्षात घेतले म्हणजे वैदिक किंवा ब्राह्मणधर्माचा कालिदासाचा पुरस्कार 'अप्रत्यक्ष' असल्याचे मी जे म्हटले त्याचे एक कारण कळून येईल.

दुसरी गोष्ट अशी की, कालिदासाची साहित्यविषयक बैठक ही एका कलावंताची आहे. प्राचीन साहित्य उपदेशप्रधान होते यात शंकाच नाही. रससिद्धान्त मान्य करणाऱ्या विवेचकांनीही चार पुरुषार्थांची प्राप्ती हसतखेळत, रिझवीत, साहित्याने करवून द्यावी अशी अपेक्षा बाळगली आहे. परंतु कलेचा आनंद आणि जीवनाचा उपदेश या दोहोंत आलटून पालटून पारडे झुकू देण्याच्या ऐवजी, कलानंद हेच साहित्याचे मौलिक प्रयोजन मानून, उपदेश अप्रत्यक्षपणे, आकर्षक व लाडक्या पत्नीच्या मागणीधारल्या, याचा ही जी भूमिका मम्मटाने घेतली आहे, तीच खरी. कालिदासाच्या साहित्याबद्दल बोलताना तरी हीच भूमिका योग्य ठरते. याही दृष्टीने म्हणजे कुठल्याही उपदेशाच्या अंकित न राहता झालेली कालिदासाची ग्रंथरचना काही तात्त्विक विचारांवर प्रकाश पाडीत असली तरी ते अप्रत्यक्षपणेच.

[ २ ]

कालिदासाचे साहित्य वाचताना ज्या कालप्रवाहाच्या काठावर आपण उभे असतो त्या वेळी, जुन्या वैदिक धर्माचे रूप थोडे पालटलेले

दिसते. कर्मकांडावर आधारलेला आचारप्रधान ब्राह्मणधर्म पुन्हा तेजाने चमकू लागला होता. उपनिषदांतील तात्त्विक विचारप्रणालीने कर्मांकडून ज्ञानाकडे मोर्चा फिरला, आणि यज्ञयागाच्या अनुष्ठानापेक्षा तपस्याप्रधान, संन्यासवृत्तीचा, खडतर मोक्षमार्ग हाच श्रेष्ठ ठरला, तरी अंततः सामान्य लोकांची लौकिक व पारलौकिक गरज आणि विशेषतः बौद्धमतांतील विचारधारेने यज्ञसंस्थेवर केलेले प्रहार या दोन गोष्टींनी, यज्ञयागाच्या रूप दर्शनीयतेला उजाळा देण्याची आवश्यकता भासू लागली असावी. कालिदासाला हे धार्मिक अंग मान्य आहे. त्याचे रघुवंशीय राजे मोठमोठाले यज्ञ करणारे होते. सार्वभौमत्वाची ग्वाही पुकारणारा अश्वमेध पुराणकालीन राजांप्रमाणे अग्निमित्राचा पिता पुष्यमित्र या शुंगवंशीय (इ. स. १ ले शतक) राजानेही केल्याची नोंद कालिदासाने दिली आहे. रघूने तर सर्वमेध करून आपल्या भांडारांतील सारा पैसा ब्राह्मणांना आणि याचकांना वाटून दिला. या राजाच्या कारकीर्दीत नद्यांचे तट यज्ञीय यूपांनी भरलेले असत आणि राजाच्या धार्मिक पुण्यशीलतेची ग्वाही पुकारीत असत. समृद्ध जीवनात अशा लहानमोठ्या यज्ञयागांचे इतके महत्त्व होते की शाकुंतलातील एक धीवर, या ब्राह्मणी जीवनापासून फार दूर असूनही, आपल्या धार्मिक धंद्याचे समर्थन करताना दृष्टान्त देतो तो श्रोत्रियाचा : यज्ञामध्ये पशुहनन करणारा श्रोत्रिय दारुण वाटला तरी त्याचे अंत:करण अनुकंपेने मृदू असते, अशी ग्वाही हा धीवर देतो. जीवनाची समृद्धी, धार्मिक आचाराची डोळ्यात भरणारी एक मान्यता, धर्मक्रियेच्या अनुष्ठानात अनेकांना एकत्र आणून पार-लौकिक कल्याणाची होणारी जपणूक, प्रजाजनांपर्यंत पोचणारा दानाचा ओघ, आणि एका दृष्टीने ऐश्वर्यसंपन्न व्यक्ती आणि सामान्य जन यांना जोडणारा एक धार्मिक दुवा : अशा अनेक कारणांसाठी यज्ञ-संस्थेचे महत्त्व कविमनाला वाटले असले पाहिजे.

ब्राह्मणकालापासूनच वैदिक देवता मागे पडून प्रजापति, विष्णू या यज्ञीय देवतांना महत्त्व प्राप्त झाले होते. श्वेताश्वतर उपनिषदात रुद्र या देवतेचे परम-तत्त्व म्हणून वर्णन आहे. या तीन देवता म्हणजे या नव्या काळातील आणि पुढील हिंदुधर्मातीलही मान्य अशी त्रिमूर्ती. कुमारसंभवात प्रजापति-ब्रह्मा आणि शिव यांचे, रघुवंशात रामाला विष्णुरूप कल्पून केलेल्या स्तुतीच्या निमित्ताने विष्णूचे, आणि आपल्या सर्वच नाटकांतून शिवाचे, अशी वर्णने कालिदासाने केलेली आहेत. कालिदासाच्या मनाला मात्र शिवरूपाचे आकर्षण अधिक आहे. उज्जयिनीच्या महाकालाच्या मंदिरातील सध्याकाळच्या आरतीचे मेघदूतातील चिन्मय वर्णन, शिवपार्वतीच्या जीवनाचे कुमारसंभवातील विस्तृत वर्णन, नाटकांच्या नांदीश्लोकांतील शिव प्रार्थना, आणि शाकुन्तलाच्या भरतवाक्यात शिवाजवळच केलेली मोक्षप्राप्तीची विनवणी, कालिदासाच्या भक्तिप्रवण मनाला शिवच प्रिय असल्याची साक्ष देतात. मात्र कालिदासाचे मन साम्प्रदायिक नाही. इतर देवतांच्या वर्णनावरून हे स्पष्ट आहेच. त्यामुळे कालिदासाची शिवभक्ती एक वैयक्तिक आवड किंवा निष्ठा होय असेच म्हटले पाहिजे. केवळ तात्त्विक आणि निरपेक्ष विचार केल्यास मात्र, कवि मनाला जबरदस्त मोह पडावा असेच शिवाचे एकंदर रूप आहे, असे लक्षात येईल. त्रिमूर्तीमध्ये शिव ही संहाराची देवता, पण यांच देवतेला ' शिव ' ही संज्ञा आहे. अमंगलाच्या परिसरात राहणारा हा देव मांगल्याची मूर्ती आहे. कपर्दी असूनही याच्या ऐश्वर्याला सीमा नाही. भोळा इतका की त्याच्या औदार्याला मर्यादा नाही. भोगप्रिय असा की उमा ही स्वगुणेने त्याची अर्धांगी नसून वाच्यार्थाने अर्धांग आहे, आणि असे असूनही याच्यासारखा योगी नाही. कला दृष्ट्या तर ताण्डव-लास्य रूप नाट्याचा शिव जन्मदाता. अर्धनारी नटेश्वर रूपामध्ये नाट्य साकार झालेले. शिवाचे हे परस्परविरोधी,

बुद्धीला चकित करणारे आणि भावनेला गुंतवून ठेवणारे रूप कालिदासाने बरोबर हेरले, असे कुमारसंभवावरून स्पष्ट दिसते. विश्वात दडलेली नव्या उन्मेषाची प्रेरणा आकाराला आणणारी शिवमूर्ती कालिदासाच्या कविमनाला म्हणून तर प्रिय नसेल?

ईश्वराचे सगुण रूप पुरातन आहे. उपनिषदांनी तात्त्विक दृष्ट्या निर्गुण निराकार ब्रह्म जगताचे आदिकारण म्हणून प्रतिष्ठित केले. ही सगुण-निर्गुण रूपे भिन्न नसून एकच आहेत, आणि जगताची उत्पत्ती, स्थिती आणि लय ही तीन वैश्विक कार्ये संपादन करणारी परमेश्वरी मूर्ती सोयीसाठी त्रिविध मानली तरी मुळात एकाच ईश्वराची ती तीन रूपे आहेत • असा एकात्मतेचा, एकदैवताचा सिद्धान्त, बुद्धीला आणि मनाला समाधान मिळेल अशा रीतीने प्रस्थापित करण्याचे कार्य गीतेने केले असे म्हणता येईल. कालिदासाच्या विचारांवर या तात्त्विक विचारांचा, विशेषतः गीतेचा प्रभाव फार मोठ्या प्रमाणावर पडलेला असला पाहिजे. मालविकाग्निमित्राच्या नान्दी श्लोकात, मानवी मनाचे परमध्येय म्हणून शिवाचे वर्णन त्याने केले, शाकुन्तलात शिवाच्या 'अष्ट तनू' वर्णन करून, ईश्वराचे अस्तित्व केवळ श्रुतिप्रणीत किंवा अनुमानगम्य वा योगसिद्ध नसून ते प्रत्यक्षातही अनुभवण्यासारखे आहे असे दाखवून एक प्रकारे निरीश्वरवादी किंवा शंकेखोरांना काव्यमय उत्तर दिले, तर विक्रमोर्वशीय नाटकाच्या नांदीत शिवाचे वर्णन 'वेदान्तेषु यमाहुरेकपुरुषम्' अशा शब्दात करून निर्गुण अद्वैत तत्त्व आणि सगुण ईश यांचे ऐक्य दर्शित केले. एकाच ईश्वराच्या रूपाची त्रिविधता

एकैव मूर्तिर्बिभिदे त्रिधा सा... ।

या कुमारसंभवातील वर्णनात (७.४४) जशी आली आहे तशी, अधिक स्पष्टपणे, रघुवंशातील विष्णुस्तुतीमध्ये (१० १६-३०) प्रकट

झाली आहे. राम हा विष्णूचा अवतार; रावणाचा संहार करण्यासाठी, म्हणजे स्वत परिपूर्ण, पर्याप्त असूनही, लोकानुग्रह म्हणून, जगदुद्धारासाठी देवाने रामाचा जन्म घेण्याचे मान्य केले, ही कल्पना मांडताना—

> अनवाप्तमवाप्तव्यं न ते किञ्चन विद्यते ।
> लोकानुग्रह एवैको हेतुस्ते जन्मकर्मणोः ॥
>
> (रघु. १०.३१)

ही कालिदासाने केलेली शब्दयोजना पाहिली म्हणजे गीतेतली अवतारवादाची कल्पना जवळ जवळ गीतेच्याच शब्दात त्याने कशी मांडली आहे याची कल्पना येते.

पूर्वजन्म आणि पुनर्जन्म, हा ब्राह्मण आणि हिंदू धर्मांशी निगडित असलेल्या धार्मिक कल्पना कालिदासाला मान्य आहेतच. अजाच्या सान्त्वनासाठी इंदुमतीचा पूर्वजन्म वसिष्ठांनी मुद्दाम वर्णन करून सांगितला आहे; तर हंसपदिकेचे गीत ऐकून हुरहुरलेला दुष्यन्त आपल्या अस्वस्थतेचे कारण 'जननान्तरसौहृद'मध्ये शोधण्याचा प्रयत्न करीत आहे. शाकुन्तल संपविल्यावर कालिदासाने शिवाजवळ जी प्रार्थना केली आहे ती 'पुनर्भव' मिटविण्याची.

कालिदासाचे मन भक्तिप्रवण होते तरी बौद्धिक भूमिकेवर मोक्ष प्राप्तीचा मार्ग म्हणून ज्ञान आणि योग याची साधना त्याने स्वीकारली असली, असे रघूच्या वानप्रस्थाश्रमाचे त्याने जे वर्णन केले आहे त्यावरून वाटते. 'योगनान्ते तनुत्यजाम्' ही रघुवंशीय राजांची प्रणाली. शाकुन्तलात हेमकूट पर्वतावर असलेल्या मारीच ऋषींच्या आश्रमात तपस्या आणि योगसाधना करीत असलेल्या योग्याचे, आणि स्वतः मारीच ऋषींच्या अलौकिक तप.साधनेचे जे वर्णन आढळते (शाकुन्तल, ७.११ व १२) त्यानेही कालिदासाच्या

विचाराची दिशा कळून यावी. यौवनात सुखोपभोग घेऊन गृहस्था-श्रमाची कर्तव्ये पूर्णत: पार पाडल्यावर, संसारातून निवृत्त होऊन वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करावा; आणि तपस्या, योगसाधना यांच्या द्वारे ईश्वरस्वरूपाचे ज्ञान संपादन करून अन्ती देह ठेवताना ईश्वरात मिळून जावे, ही कालिदासाची विचारसरणी आहे (शाकुन्तल, ७·२०; ४·२० पाहा). जीवनाचा आनंद मनमुराद उपभोगल्यानंतर निवृत्ती तर साधना तितक्याच उत्कटपणे व्हावी, ही कालिदासाची इच्छा—

यत् काङ्क्षन्ति तपोभिरन्यमुनयस्तस्मिंस्तपस्यन्त्यमी ।
(शाकुन्तल, ७·१२)

या विस्मयपूर्ण आदरोद्गारात प्रकट झाली असावी. प्रचलित धार्मिक तत्त्वज्ञान स्वीकारताना, जीवनातल्या चारही पुरुषार्थांचे साफल्य कालि-दासाला समभावाने अभिप्रेत होते, असे एकंदरीत दिसते.

[३]

कालिदासाच्या तिन्ही नाटकांत आणि रघुवंश या महाकाव्यात राजचरित हा कथेचा मुख्य विषय आहे. राजजीवनाची— अंतःपुरातील कलह, मत्सर, ईर्ष्या आणि परिहासाचे प्रसंग इत्यादींसहित— इतक्या बारकाईने चित्रे दुसऱ्या कोणी संस्कृत लेखकाने रंगविलेली दिसत नाहीत. श्रीहर्षाच्या उदयन-नाटकांत ही चित्रे असली तरी त्यात कालिदासाचे अनुकरण आहे, आणि पुढील नाट्यशास्त्रात या वर्णनाचे संकेत झालेले आहेत. कालिदासाला राजजीवनाचे हे [illegible] जवळून चित्रण करता आले त्याचा उगम केवळ [illegible] तर राजसांनिध्यात असला पाहिजे, म्हणजे कालिदास [illegible]

नसून राजाचा कोणी पदाधिकारी असला पाहिजे; आणि त्यामुळेच त्याला हे चित्रण शक्य झाले असावे हे मागे सुचविले आहेच. या चित्रणाचा एक परिणाम असा की कालिदासाची राजा आणि राजशाही याबद्दलची विचारसरणी स्पष्टपणे कळून यायला चांगली मदत झाली आहे.

प्रथमच एक गोष्ट अशी लक्षात येते की कालिदास कोणाही राजा-बद्दल जे बोलतो ते राजाश्रयाच्या पोटी उत्पन्न झालेल्या कृतज्ञतेने मात्र नव्हे; मनाने तो राजनिष्ठ आहे, Royalist आहे, आणि हे तत्कालीन परिस्थितीत समजण्यासारखे आहे. परंतु या निष्ठेचा एक अर्थ असा की राजा पराक्रमी, न्यायी आणि उदार असला म्हणजे प्रजेला स्वत:च्या कल्याणाची चिंता करावयास नको : सुराज्य असताना प्रजाजनांना काही अडचणी, दुःखे असूच शकणार नाहीत : असा कालिदासाचा विश्वास आहे. रघुवंशातील आदर्श राजाची गोष्ट वेगळी; पण अग्निमित्रासारख्या पार्थिव सत्ताधीशालाही कालिदासाने अशी प्रशस्ती बहाल केली आहे की त्याच्या राजवटीत प्रजाजनांना दैवी किंवा ऐहिक संकटाचे वारे शिवले नाही ( मालविकाग्निमित्र, ५·२० ). या भूमिकेत राजसत्ता आणि प्रजेची इच्छा यामध्ये संपूर्ण अविरोध कल्पिलेला आहे.

आदर्श राजाच्या कारकीर्दीत विरोधाला वाव उरणार नाही हे खरे असले तरी ज्या अधिकाऱ्यांच्या साहाय्याने राज्यशासन चालवावे लागते त्या अधिकाऱ्यांच्या नेकीचे आणि निष्ठेचे काय ? शाकुन्तलात तरी दोन उदाहरणे अशी दिसतात की ज्यामध्ये ढोंग आणि अनीती यांचा वास येतो : शकुन्तला दृष्टीस पडल्यापासून दुष्यन्ताचे मृगयेवरचे लक्ष उडाले आहे. सुखप्रिय विदूषकालाही शिकारीचा धकाधकीचा मामला नको आहे; आणि त्यामुळे त्याचा शिकारीला विरोध स्वार्थी असला तरी सहज समजण्यासारखा आहे. परंतु शिकारीत दुष्यन्ताच्या बरोबर असलेल्या त्याच्या सेनापतीने, विदूषकाच्या कानी लागून,

'तुझा विरोध चालूच ठेव' असे म्हणावे आणि वरवर 'मालकाची मर्जी सांभाळण्याची इच्छा' धरून दुष्यन्ताच्या तोंडावर मृगयेची शिफारस करावी, या वर्णनाचा अर्थ काय? दुष्यन्ताचा कोतवाल आणि शिपाई यांचे वर्तन तर याहून स्पष्ट असे अनीतीचे आहे. धीवराकडून ते त्याच्या पारितोषिकाची अर्धी रक्कम उपटतात आणि ह्या नव्या मैत्रीवर शिक्कामोर्तब करण्यासाठी दारुगुत्त्याकडे वळतात. दुष्यन्ताच्या आदर्श चित्रणाला गालबोट लावणारे रंग कालिदासाने वापरलेच का? दुष्यन्ताचा सेनापती हा तोंडपुज्या होता आणि त्याचे शिपाई नीतिभ्रष्ट होते, असाच या चित्रणाचा उघड दिसणारा तरी अर्थ आहे. दुष्यन्ताच्या राज्यात कोणीही वाईट मार्गाने जात नव्हते, या विधानाला हे विसंगत आहे. असे भव्यदिव्य लोकांच्या इच्छेने कुठे उग्र रूप धारण केलेले कालिदासाच्या साहित्यात दिसत नाही; किंवा बुद्धाच्या राजवंशात आणि मगधामध्ये प्रचलित असलेल्या गणतंत्र शासनपद्धतीचा ( Republican Government ) कालिदासाने उल्लेख केलेला नाही. तेव्हा वरील उदाहरणे अपवादरूप असून कालिदास हा हाडाचा राजनिष्ठ आहे, असेच म्हटले पाहिजे.

मात्र कालिदासाच्या या चित्रणाचा आणखी एक अर्थ करता येण्यासारखा आहे. तो असा की, अंतिम सत्ता ही राजाची; त्यामुळे राजाचे अधिकारी प्रसंगी भ्रष्ट झाले तरी राजाच्या अनिर्बंध सत्तेमुळे आणि राजापर्यंत प्रत्यक्ष जाऊन दाद मागण्याची सोय शासनव्यवस्थेत असल्यामुळे, भ्रष्ट अधिकाऱ्यांचे दोष किंवा दमदाटी अनुज्ञात ठेवण्याची एक शक्ती प्रजेच्या हाती होती; आणि त्यामुळे या उपद्रवाला आपोआपच मर्यादा पडत होती. कालिदासाच्या वरील चित्रणाचा असा अर्थ लावल्याशिवाय गत्यंतर नाही. नाही तर, मानवी स्वभावाचे सूक्ष्म ज्ञान असणाऱ्या कालिदासाने, वास्तववादाच्या भूमिकेवर, मानवी

दोषावर येथे नेमके बोट ठेविले आहे, असा कल्पनेने खुलासा करू-नही, या चित्रणातील राजकीय अन्वयार्थ झाकला जाण्याची शक्यता नाही. असे अधिकारी नेमण्याइतका दुष्यन्त मोठा होता किंवा कालि-दासाचे अवधान येथे सुटले असे मानण्यापेक्षा, कालिदासाचा राज-सत्तेवरील विश्वासच अधिक प्रभावी आहे असे मानणेच अधिक बरे. आणि आपल्या राजाचे व्यक्तिचित्र रंगविताना त्याच्या स्वभावातली प्रजाहिताची दक्षता कालिदासाने मुद्दाम स्पष्ट करून दाखविली आहे, असे दिसून येते. शिकारीच्या जोषात भरधाव घोडे उधळीत निघालेला दुष्यन्त, वैखानसांनी थांबविल्यावर आणि ' आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि ' असे बजावल्यावर, घाईघाईने रथ थांबवितो आणि रोखलेला बाण मागे घेतो. प्रचलित कायद्याप्रमाणे निपुत्रिकाची संपत्ती राजाच्या कोशागारात जमा व्हावी, आणि तसा निर्णय मन्त्रिमंडळाने घेतला असताही, दुष्यन्त हा निर्णय स्थगित करतो आणि सार्थवाह धनमित्राच्या तरुण गरोदर विधवेला न्याय देतो. यज्ञात सर्व संपत्तीचे दान करून पाकिंना रिकामा झाल्यावर, गुरुदक्षिणा मागण्यासाठी आलेल्या कौत्साला रघू रिक्त हस्ताने परत पाठवीत नाही; तर धावायला लागून कुबेरावर हल्ला करण्याचा बेत करतो. कालिदासाने दिलेली ही उदाहरणे पाहिली म्हणजे त्याचाच केवळ नव्हे, तर प्रजेचाही राजाच्या न्यायीपणावर आणि औदार्यावर विश्वास असावा, असे वाटू लागते. स्वतःच्या नातेवाइकापेक्षा दुष्यन्त हा जवळचा आप्त, बंधू, असा प्रजाजनांना वाटत होता असे जे कालिदास म्हणतो ( शाकुन्तल, ५-८ ), त्याचा संबंध या विश्वासाशीच जोडला पाहिजे.

वस्तुतः तत्कालीन राजपद हे आनुवंशिक होते, आणि अनिर्बंध सत्तेचे अधिष्ठान होते. लोकशाहीमध्ये कायदा, अमलबजावणी आणि

न्याय हे तीन स्वतंत्र शासनाचे भाग असून, सत्तेचे येथे स्पष्ट विकेन्द्रीकरण झालेले असते. न्याय शासनाच्या अंकित नसतो, आणि शासक हे लोकप्रतिनिधींच्या कायदेमंडळाला संपूर्ण जबाबदार असतात. प्राचीन भारतीय राज्यशासनाचे अमर्याद राजशाही ( Unlimited Monarchy ) असेच वर्णन या तात्त्विक दर्शनें करावे लागेल. कारण शासनाची वरील तीनही अंगे राजाच्या हाती होती. शासनव्यवस्थेसाठी राजाने अधिकारी नेमले किंवा मंत्रिपरिषद बाळगली तरी त्यांची नेमणूक व अधिकार राजाने निर्माण केलेले असत, आणि सर्वोच्च न्यायालयाचा अंतिम अधिकार तर राजाचाच असे, हे वर सांगितलेल्या साधनाद्द धनमित्राच्या प्रकरणाने स्पष्ट होते. असे असूनही राजसत्तेचा हा एकतंत्री अंमल लोकांनी मानला, त्यांना तो मुकाट्याने झाला, याचे कारण आधुनिक मीमांसक असे देतील की लोकशाहीच्या दर्शनाची आणि मानवी मूलभूत हक्कांची जाणीव होण्याइतकें तत्कालीन जनमानस प्रौढ आणि प्रगत झाली नव्हती. हे खरे असावे. कालिदासाच्या साहित्यात मात्र राजाच्या अनिर्बंध सत्तेला अंकुश लावणारा काही पद्धे आढळून येतात

कायदा आणि त्याची अंमलबजावणी राजाच्या हाती असली तरी एकंदर राजशासन धर्मशास्त्र आणि राजकारणा यथार्थात तात्त्विक विचारसरणी याला अनुसरून चाले. शासनाची तात्त्विक बैठक धर्मशास्त्रात आणि त्याचा व्यावहारिक कार्यवाहा अर्थशास्त्रासारख्या ग्रंथात दिसून येतात. हे शास्त्र प्रमाण मानून राजे राज्यशासन करत. कायदे बांधून देण्याचा अधिकार धर्मशास्त्राचे व स्मृतींचे प्रणेते जे ऋषिमुनी त्यांचा, आणि व्यावहारिक मार्गदर्शन, विशेषतः राजकारणाच्या क्षेत्रात, कौटिल्यासारख्या अनुभवी मुत्सद्द्याने किंवा शान्तिपर्व आणि अनुशासनपर्व रचणाऱ्या व्यासांनी करावयाचे. या व्यवस्थेचा अर्थ असा करता येईल की, समाजातील श्रेष्ठ विचारवंतांनी शासनाचे

पद्धतीत होती, असे म्हटले पाहिजे.

कालिदासाचा स्वतःचा भर मात्र नैतिक मूल्यांवर आणि आदर्शांवर होता, असे त्याच्या वर्णनावरून वाटते. 'राजा' शब्दाची व्युत्पत्ती 'राजते, शोभते' अशी ( राज् या धातूपासून ) ऐश्वर्यसूचक करण्यापेक्षा, 'प्रजानुरञ्जनात् राजा' अशी ( रञ्ज् धातूपासून ) करून, प्रजेसाठी जीवन वेचणाऱ्या राजाचा आदर्श कालिदासाने सुचविला आहे. त्याचा दुष्यन्त प्रजेला अपत्याप्रमाणे सांभाळणारा ( 'प्रजाः प्रजाः स्वा इव तन्त्रयित्वा', शाकुंतल, ५·५ ), स्वतःच्या सुखाची पर्वा न करिता लोकांच्यासाठी रात्रंदिन कष्टणारा ( 'स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः' शाकुन्तल, ५·७ ) असा आदर्श राजा आहे. आडमार्गाने जाणाऱ्या प्रजेचे कटवपणे शासन करून, वाद–कलह जागच्या जागी दडपून, प्रजेच्या रक्षणाची जबाबदारी काटेकोरपणाने पाळणारा दुष्यन्त होता, त्यामुळेच त्याच्याविषयी बन्धुभावाची, आपुलकीची भावना लोकांच्या मनात सदैव जागृत होती ( शाकुन्तल, ५·८ ). दुष्यन्ताला कालिदासाने 'राजमुनी' म्हटले आहे ते त्याच्या सेवादक्ष वृत्तीसाठी. राजाने प्रजेकडून कर घ्यायचा तो शास्त्रात सांगितल्याप्रमाणे एकषष्ठांश. पण 'षष्ठांशवृत्ती' राजा कर घेतो तोही पृथ्वीवरील जल शोषून घेऊन पर्जन्यरूपाने ते सहस्रगुणित करून परत देणाऱ्या सूर्याप्रमाणे, प्रजेला सहस्रपट समृद्धी व्हावी करण्यासाठी ( रघुवंश, १·१८ ).

राज्याचा शासक म्हणजे प्रजेचा केवळ पालनकर्ता नव्हे तर पिता, ही कालिदासाची भावना आहे. प्रसंगी दण्डशासन करणाऱ्या शासकाच्या पोटात पित्याचे वात्सल्य असते. कौटिल्याने सांगितलेल्या आदर्शाप्रमाणे, प्रजेचे हित आणि सुख तेच आपले हित आणि सुख मानून त्याप्रमाणे प्रत्यक्ष आचरण ठेवणारे राजे प्रजेचे स्वामी

आणि राज्यव्यवहाराचे जे नियम बांधून दिले त्याची अंमलबजावणी करणारा शास्ता म्हणजे राजा. या भूमिकेवर राजाच्या सत्तेचे नियमन करणारी शक्ती ही समाजातील विचारवंतांची शक्ती होय, असे म्हटले पाहिजे.

दुसरी गोष्ट अशी की, केवळ शासनाला साहाय्य म्हणून नव्हे तर एकांगी निर्णयाचा प्रमाद टळावा म्हणूनही अमात्यांचा, मंत्र्यांचा सल्ला राजे घेत व प्रसंगी त्यांच्यावर शासनाची जबाबदारी टाकीत असे कालिदासाच्या उल्लेखावरून दिसते. विदर्भावर स्वारी करण्याचा निर्णय घेण्यापूर्वी अमात्य परिषदेचे म्हणणे समजावून घेण्याची इच्छा, अग्निमित्र प्रकट करतो; तर इन्द्राच्या बोलावण्यावरून स्वर्गामध्ये युद्धावर जाताना, दुष्यन्त राज्यशासनाची धुरा आपल्या अमात्याच्या खांद्यावर देतो आणि सांगतो की, आमचे धनुष्य अन्य कर्मात गुंतले असता तुम्ही आपल्या बुद्धीच्या जोरावर प्रजेचा सांभाळ करावा (शाकुन्तल, ६·३२). मंत्री आणि विचारवन्त यांचा सल्ला आणि तो आदरपूर्वक पाळण्याची वृत्ती, हा राजसत्तेचा आणखी एक अंकुश.

शिवाय पुढे राजा होणाऱ्या तरुण राजपुत्राचे राजकीय शिक्षण कटाक्षाने आणि शिस्तीने करण्याची काळजी त्या काळी घेतली जात असे, आणि राजकारणाचे पाठ देताना यौवन आणि सत्ता यांचा धोका स्पष्ट करून सांगण्याचे कार्य राजशिक्षक आवर्जून करीत असत, याची ग्वाही संस्कृत साहित्यात, विशेषतः कालिदासाच्या रघूच्या वर्णनात आणि बाणाच्या शुकनासोपदेशात, स्पष्टपणे आहे. राजपद वंशपरंपरेने येत असले तरी सर्वगुणी योग्य वारसाची निवड स्वतः राजा पिता त्यांचे मंत्री करीत, याचाही पुरावा संस्कृत साहित्यात आहे. म्हणजे शिक्षण, शिस्त आणि योग्यता यांचा लगाम स्वच्छंदी स्वैराचाराला आणि अत्याचाराला लावणारी अशी व्यवस्था प्राचीन राजकीय

पद्धतीच होती, असे म्हटले पाहिजे.

कालिदासाचा स्वतःचा भर मात्र नैतिक मूल्यावर आणि आदर्शावर होता, असे त्याच्या वर्णनावरून वाटते. 'राजा' शब्दाची व्युत्पत्ती 'राजते, शोभते' अशी ( राज् या धातूपासून ) ऐश्वर्यसूचक करण्यापेक्षा. 'प्रजानुरञ्जनात् राजा' अशी ( रञ्ज् धातूपासून ) करून, प्रजेसाठी जीवन वेचणाऱ्या राजाचा आदर्श कालिदासाने सुचविला आहे. त्याचा दुष्यन्त प्रजेला अपत्यांप्रमाणे सांभाळणारा ( 'प्रजाः प्रजाः स्वा इव तन्त्रयित्वा', शाकुंतल, ५·५ ), स्वतःच्या सुखाची पर्वा न करिता लोकांच्यासाठी रात्रंदिन कष्टणारा ( 'स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः' शाकुन्तल, ५·७ ) असा आदर्श राजा आहे. आडमार्गाने जाणाऱ्या प्रजेचे कडकपणे शासन करून, वाद–कलह जागच्या जागी दडपून, प्रजेच्या रक्षणाची जबाबदारी काटेकोरपणाने पाळणारा दुष्यन्त होता, त्यामुळेच त्याच्याविषयी बन्धुभावाची, आपुलकीची भावना लोकांच्या मनात उद्भव जागृत होती ( शाकुन्तल, ५·८ ). दुष्यन्ताला कालिदासाने 'राजमुनी' म्हटले आहे ते त्याच्या सेवादक्ष वृत्तीसाठी. राजाने प्रजेकडून कर घ्यावयाचा तो शास्त्रात सांगितल्याप्रमाणे एकषष्ठांश. पण 'षष्ठांशवृत्ती' राजा कर घेतो तोही पृथ्वीवरील जल शोषून घेऊन पर्जन्यरूपाने ते सहस्रगुणित करून परत देणाऱ्या सूर्याप्रमाणे, प्रजेला भरघोस समृद्धी प्राप्त करण्यासाठी ( रघुवंश, १·१८ ).

राज्याचा शासक म्हणजे प्रजेचा केवळ पालनकर्ता नव्हे तर पिता, ही कालिदासाची भावना आहे. प्रसंगी दण्डशासन करणाऱ्या शासकाच्या पोटात पित्याचे वात्सल्य असते. कौटिल्याने सांगितलेल्या आदर्शाप्रमाणे, प्रजेचे हित आणि सुख तेच आपले हित आणि सुख असे मानून त्याप्रमाणे प्रत्यक्ष आचरण ठेवणारे राजे प्रजेचे स्वामी

आणि सेवक या दोन्हींनी भूमिका पार पाडू शकतात आणि अशा वर्तनाने सामाजिक जीवनाचीही प्रतिष्ठा वाढवू शकतात. दुष्यन्त हे असे एक उदाहरण. दुष्यन्ताची सदसद्विवेकबुद्धी इतकी तीव्र आहे की, कण्वाश्रमाहून तापस आले आहेत असा निरोप मिळताच, आपल्या आचरिताने आश्रमातील जीवन बाधित तर झाले नाही ना, अशा अनेक शंकाकुशंकांनी तो व्याकुळ होतो (शाकुन्तल, ५·९). अदृश्य मातली विदूषकाला कुस्करीत असता त्याचा आरडाओरडा ऐकून, आपल्या घरात भूतबाधा झाल्याची शंका त्याला येते, आणि, आपल्याच हातून रोज रोज जे प्रमादस्खलित न कळत होतात ते ध्यानात येण्याची शक्ती आपल्यात नाही तर प्रजेच्या आचरणाचा कसा ठावठिकाणा लागावा, अशी अगतिकता त्याला जाणवते (शाकुन्तल, ६·२६). स्वतःशी आत्मपरीक्षण करणारा इतका जागरूक आणि जबाबदार राजा असेल तर प्रजेला आणखी काय हवे?

रघुवंशीय राजनीती—

क्रान्ती झाल्यास सारे समाजजीवनच हादरून जाण्याची शक्यता प्राचीन काळी होती. बुद्धधर्माच्या प्रसाराने, विशेषतः राजकीय सत्तेच्या अधिष्ठानावरून झालेल्या प्रसाराने, समाजजीवनावर असा खोलवर परिणाम झाल्याची साक्ष आपल्याला इतिहासावरून मिळण्यासारखी आहे. बुद्धाच्या तात्त्विक विचारप्रणालीमध्ये जातिधर्माचे उच्चाटन झाले होते; आणि संसार हा दुःखमय आहे या निदानामुळे विरक्त संन्यस्त वृत्तीने जोर धरलेला होता. हा दृष्टिकोण पालटला तो ब्राह्मण धर्माच्या पुनरुज्जीवनामुळे. सामाजिक दृष्टीने विचार करता, या ब्राह्मणधर्माचे अधिष्ठान वर्णाश्रमव्यवस्थेवर आहे हे आपल्या लक्षात येईल. कालिदासाने वर्णाश्रमधर्माची श्रेष्ठता आपल्या साहित्यात वर्णन केली आणि नकळत या पुनरुत्थानाला हातभार लावला, असे आपण म्हणू शकू.

चातुर्वर्ण्य हे गुणकर्मविभागाने निर्माण झाले आहे असा समाजशास्त्रीय सिद्धान्त गीतेमध्ये आहे. वाडिक परंपरेने आलेले गुण आणि ज्या वातावरणात आणि परिसरात आपण वाढतो त्यातून, अवलोकनाने, शिक्षणाने एखादे काम करण्याचे आलेले कसब, या दोन गोष्टींनी आपले धर्मविषयक कर्तव्य ठरते; ते कोणतेही असले तरी त्याचा स्वीकार करून त्याचे आचरण करण्यात व्यक्तीचे आणि पर्यायाने समाजाचे हित आहे, असे या सिद्धान्ताचे स्पष्टीकरण गीतेमध्ये सूचित आहे. कालिदासाला चातुर्वर्ण्याचा हा अर्थ अभिप्रेत असलाच पाहिजे. त्याने रंगविलेले राजे क्षात्रधर्माचे पालन कसोशीने करीत, आणि 'आर्तत्राण', 'आर्तभयोपशान्ति' करण्यासाठी आपल्या हाती शस्त्र आणि सत्ता आहे असे मानीत. शाकुन्तलातल्या धीवरदेखील, शिपायांनी त्याच्या धंद्यावरून केलेल्या चेष्टेला उत्तर देताना म्हणतो की, जन्माने प्राप्त झालेले कर्तव्य इतरांना निंद्य वाटले तरी ते टाकावयाचे नसते; आणि माणसाच्या स्वभावाची पारख

त्याच्या धंद्यावरून ठरावयाची नसते, तसे असते तर यज्ञात बोकड कापणारा श्रोत्रिय खरोखरीच कसाबट्टयी म्हणावा लागेल! या उद्गाराचा अर्थ निदान इतका तरी करायला हवा की वर्णविहित कर्म स्वखुषीने स्वीकारण्याची तयारी लोकांच्या मनात होती.

वर्णधर्माचे पालन करण्याची जबाबदारी वैयक्तिक असली तरी लोक तसे आचरण करतात की नाही हे पाहण्याची नैतिक जबाबदारी राजाची असे. रघुवंशीय राजे आणि दुष्यन्त या जबाबदारीकडे जातीने लक्ष देत. दुष्यन्ताचा पुरोहित कण्वाश्रमाहून आलेल्या तापसांना दुष्यन्ताची ओळख करून देतो ती 'वर्णाश्रमाणा पालयिता' अशा शब्दांत. दुष्यन्ताच्या राज्यात खालच्या वर्णाचे लोकही वाईट मार्गाने जात नसत अशी कबुली शारद्वताने दिली आहे. स्वतः दुष्यन्त आपल्या आचरणाची मर्यादा सोडीत नाही. शकुन्तलेकडे आकृष्ट झाल्यावर ती 'क्षत्रपरिग्रहक्षमा' आहे की नाही हा विचार त्याच्या मनात प्रथम आलेला आहे. विमार्गाने जाणाऱ्यांना कडक शासन करून वर्णधर्माची मर्यादा सांभाळली जाईल अशी दक्षता शासनाने घेतल्यावर, सामूहिक जीवनाला स्थैर्य साहजिकच लाभावे. कालिदासाचा रोख या सामाजिक स्वास्थ्यावर आहे, असे त्याच्या साहित्यावरून दिसते.

वर्णधर्मापेक्षा आश्रमधर्माचा संबंध व्यक्तीशी अधिक जवळचा आहे. मर्यादित मानवी आयुष्यात व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास साधणारी अशी ही आश्रमव्यवस्था आहे. आणि कालिदासाला ही व्यवस्था फार प्रिय दिसते; कारण राजचरित्राच्या वर्णनामध्ये चार आश्रमांचा उल्लेख अनेक वेळा आलेला आहे. आदर्श रघुवंशीय राजे

शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम्।
वार्धक्ये मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुत्यजाम्॥

(रघुवंश, १-८)

असे होते. बालपणी विद्याभ्यास करावा, यौवनात गृहस्थाश्रमातील सुख उपभोगावे, वार्धक्य आले म्हणजे घरापासून दूर होऊन मुनी-प्रमाणे विरागी, संयत वृत्तीने राहावे, आणि शेवटी योगसाधनेने ईश्वरप्राप्ती साधून जीवन संपवावे : हा आश्रमधर्माचा अर्थ. आणि कालिदासाच्या दृष्टीने आदर्श जीवन जगण्याची ही आदर्श व्यवस्था.

याचा अर्थ मला असा करावासा वाटतो की, बुद्धप्रणीत निवृत्ती किंवा उपनिषदांची विरक्तता जीवनाचे एकमेव ध्येय मानून त्याप्रमाणे जीवनाची आखणी करावी हे कालिदासाला मान्य होणार नाही. आणि त्याचप्रमाणे, सर्व काही कळून-सवरून तोंडाने मोक्षाची पारमार्थिक भाषा बोलत राहण्याचा ढोंगीपणाही— जो आजही आढळणार नाही असे नाहीच— कालिदासाला संमत झाला नसता. अखेरचा मार्ग आणि मुक्काम निश्चित असला तरी मनुष्याला समजू लागल्यापासून त्याने त्याच दिशेने पावले टाकायला सुरुवात करावी, हे कालिदासाच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानात बसण्यासारखे नाही. मानवी जीवनाच्या चार अवस्था आहेत. प्रत्येक अवस्थेची एक मागणी आहे, अपेक्षा आहे. आणि तिला अनुरूप अशा गोष्टी निसर्गाने, नियतीने, तयार करून ठेवल्या आहेत. त्या प्रत्येक अपेक्षेची पूर्ती करीत जीवनाचा मुक्काम गाठावयाचा आहे. कालिदासाने स्वतः मोक्षाची प्रार्थना केली ती शाकुन्तल लिहून पूर्ण झाल्यावर : जीवनात जे करावयाचे होते, साधावयाचे होते, ते पूर्ण होऊन वृद्धावस्थेची भावना मनात उदय पावल्यावर.

या भूमिकेशी सुसंगत असे, गृहस्थाश्रमाचे महत्त्व स्मृतिग्रंथांनी प्रतिपादिले आहे; आणि कालिदासाच्या साहित्यात, त्याने रंगविलेल्या कौटुंबिक जीवनाच्या चित्रांत, हे तत्त्व प्रकट झाले आहे. पोटी संतती नाही म्हणून व्याकुळ झालेला दिलीप आणि त्याची पत्नी सुदक्षिणा

नाची एक मागणी आहे आणि ती पुरी करणे हाही एक पुरुषार्थ आहे. गृहस्थजीवन आणि त्यातील सुखोपभोग, अशा रीतीने, धर्मांच्या, निसर्गाच्या आणि परिपूर्ण जीवनाच्या अधिष्ठानावर कालिदासाने स्वीकारलेला आहे. कालिदासाची काव्यनाटके समजावून घेताना आपण जर या भूमिकेचे विस्मरण होऊ दिले, किंवा ढोंगी तपस्येच्या आवरणाखाली ही भूमिका झाकून ठेवण्याचा अप्रयोजकपणा केला तर कालिदासाला आणि त्याच्या कलेला आपण फार मोठा अन्याय करू, असे मला वाटते.

याचा अर्थ असा नव्हे की, अनिर्बंध विषयोपभोग कालिदासाने मान्य केला आहे. यौवन किंवा सत्ता हा स्वैरभोगाचा परवाना नव्हे. असे वागले तर काय होते याचे विदारक चित्र अग्निवर्ण राजाच्या वर्णनात कालिदासाने रंगविले आहे (रघुवंश, १९). अतिरेकी भोगाच्या पायी हा राजा क्षय होऊन मेला. अप्सरांच्या मोहाला बळी पडलेला शातकर्णी आणि दान्तचरित असलेला तपस्वी सुतीक्ष्ण यांची विरोधी चित्रे शेजारीशेजारी मांडून (रघुवंश, १३·३८-४४) कालिदासाने संयम आणि इंद्रियनिग्रह यांचेच महत्त्व सूचित केले आहे. कालिदासाच्या नायक-नायिकांच्या चित्रणावरून जी गोष्ट स्पष्ट होते ती अशी की, जीवनात भोगाला निश्चित स्थान आहे; पण हा भोग म्हणजे 'धर्माविरोधी काम' आहे आणि तो संयमाच्या अंकित राहायलाच हवा. मात्र संयमाचा अर्थ अनादर नाही, हेही स्पष्ट केले आवश्यक आहे.

[५]

धर्म, तत्त्वज्ञान, राजनीति यांबाबत कालिदासाची जी भूमिका आहे, म्हणजे प्रचलित सर्वमान्य तत्त्वे त्यांच्या दृष्टी स्वीकारण्याची, तीच

भूमिका त्याच्या सामाजिक तत्त्वज्ञानात, विशेषतः वैवाहिक, कौटुंबिक जीवनाविषयी दिसून येते. तत्कालीन समाजव्यवस्थेत बहुपत्नीत्वाची चाल रूढ होती. कालिदासाचे बहुतेक सर्व नायक बहुपत्नीक आहेत. अपवाद यक्षाचा, रामाचा. ह्या सामाजिक व्यवस्थेत स्त्रीचे स्थान पुरुषाच्या नंतर, दुय्यम असणे अपरिहार्य आहे. सामाजिक दृष्टीने तरी या विषमतेला कालिदासाने वाचा फोडली नाही; उलट आहे ती परिस्थिती जशीच्या तशी स्वीकारली असे दिसून येते. रामाने त्याग केल्यावर, कालिदासाची सीता लक्ष्मणाबरोबर निरोप पाठविते तो एवढाच की, असे वागणे तुझ्या शहाणपणाला आणि कुळाला शोभले का ? (रघुवंश, १४.६१) दुष्यन्ताने अव्हेरलेल्या शकुन्तलेला शार्ङ्गरव सुनावतो : पतिकुले तव दास्यमपि क्षमम् । (शाकुन्तल, ५·२७) आणि शान्तगंभीर वृत्तीचा शारद्वतही दुष्यन्ताचा, म्हणजे पतीचा, पत्नीवरील अधिकार शान्तपणे स्वीकारून, शकुन्तलेचे त्याने वाटेल ते करावे असे सांगताना म्हणतो : उपपन्ना हि दारेषु प्रभुता सर्वतोमुखी । (शाकुन्तल, ५·२६). प्रज्ञावान कण्वालाही या सामाजिक विषमतेवर तोड सुचलेली नाही. प्राप्त परिस्थिती स्वीकारून त्या चौकटीतच आपले कर्तव्य बजावण्याचा उपदेश पतिगृही निघालेल्या आपल्या मानसकन्येला त्यांनी केला आहे : गुरुजनांची सेवा कर. सवतींशी प्रिय मैत्रिणीबरोबर वागावे तशी स्नेहभावाने वाग. पतीने अवमान केला तरी चिडून रागारून त्याच्याविरुद्ध जाऊ नकोस...विवाहित तरुणींना गृहिणीची योग्यता लाभते ती अशा वागण्यामुळे. विपरीत वागणाऱ्या कुलाला कलंक ठरतात (शाकुन्तल, ४·१८). हा उपदेश म्हणजे प्राप्त परिस्थितीशी समजसपणाने केलेली तडजोड आहे यात शंकाच नाही. पतीच्या अंकित राहून गृहिणीपद सार्थक करणे ही काय ती स्त्रीच्या जीवनाची इतिकर्तव्यता.

त्या काळी वडीलधाऱ्या मंडळींनी ठरविल्याप्रमाणे विवाह होत असतीलही. रामाचा विवाह असा झालेला होता. परंतु स्वयंवर, गान्धर्वविवाह, प्रीतिविवाह या पद्धतीही रूढ असाव्यात असे अनुमान कालिदासाच्या काव्यनाटकावरून तरी करता येते. या विवाहपद्धतींमध्ये आपला जोडीदार निवडण्याचे स्वातंत्र्य स्त्रीला निश्चितच आहे. परंतु या स्वातंत्र्याची मर्यादाही तितकीच निश्चित आहे. समाजाने पुरुषाला बहाल केलेल्या या अधिकारामुळे स्त्रीच्या वैयक्तिक जीवनाचा कोंडमारा किती होतो याची सखेद जाणीव भवभूतीला झालेली दिसते. 'स्त्रीचे मन फुलासारखे नाजूक आहे. उत्तम कुलाचे संस्कार घेऊन जन्माला आलेली कुलकन्यका निरागस, लज्जाशील, कुणाला न दुखवणारी अशी असते, अशा मुलीशी विवाह करून तिच्यावर हुकमत गाजविण्याचा, जाळणाऱ्या शब्दांनी तिच्या सवेदनाशील, कोमल मनाला चटका देण्याचा निष्ठुरपणा कोण करील ! पण पुरुष अदूरदृष्टीचे असतात; निरस्त आणि हेकेखोर असतात; स्वामित्व गाजविण्याचा त्यांना लोभ सुटतो. आणि त्यामुळे स्त्रीचे हृदय पराङ्मुख होते; स्त्रीजीवन ही एक व्यथा आहे, तिचा अंत मरणानेच होणार, अशी तिची भावना होते. मातापितरे आणि आप्तजन याना मुलीचा जन्म त्यामुळेच नकोसा वाटतो' ( मालतीमाधव, अंक ७, पंक्ती ६८-७२ ). भवभूतीच्या या उद्गारात केवढे दारुण सत्य आहे, सामाजिक विषमतेची केवढी तीव्र जाणीव आहे, स्त्रीजीवनाविषयी केवढी अनुकंपा आहे ! कालिदासाने पतिपत्नीच्या विरहदुःखाला अनेक वेळा मुखर केले. पण या व्यथेकडे मात्र त्याचे लक्ष गेले नाही. आणि याचे कारण ही व्यथा त्याच्या अनुभवातून निसटली, किंवा अधिक सयुक्तिक म्हणजे, जीवनाच्या सर्व अंगांचे तत्त्वज्ञान प्रचलित, मान्य पद्धतीने, जसेच्या तसे स्वीकारण्याची त्याची मनोवृत्ती आहे, असे म्हणून दिले पाहिजे.

[ ६ ]

शिक्षण हा कुठल्याही काळात सांस्कृतिक जीवनाचा आधार आहे. प्राचीन शिक्षणपद्धतीविषयी अप्रत्यक्ष आणि प्रत्यक्ष असे बरेच उद्गार कालिदासाने काढले आहेत. कालिदासाचा जीवनविषयक दृष्टिकोण समजून घेताना या विचाराचे महत्त्व आहेच.

प्राचीन शिक्षण गुरुकुलातून होत असे, आणि हे शिक्षण आश्रमात गुरुगृही शिकणाऱ्या मुलामुलींच्या दृष्टीने व्यापक स्वरूपाचे असे, ही कल्पना आपल्याला आहेच. शाकुन्तलातील कण्वाश्रम ही अशीच एक शिक्षणसंस्था होती असे म्हणता येईल. कण्वाना कुलपती म्हटले आहे. ' कुलपती ' शब्दाचा कोशातला अर्थ असा की दहा हजार विद्यार्थ्यांना अन्नपाणी देऊन विद्या शिकविणारा विप्रर्षि. या व्याख्येतल्या अति-शयोक्तीचा भाग सोडला तरी, आपापले घर सोडून विद्याभ्यासासाठी गुरुगृही येऊन राहाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पालनपोषणाची जबाबदारी, ते स्नातक होईपर्यंत गुरूवर असे, हे उघड आहे. विद्याभ्यास करणाराला, हल्लीच्या पद्धतीप्रमाणे, प्रतिमासी शुल्क द्यावे लागत नसे, हेही आपल्याला माहीत आहे. विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर आपल्या शक्ती-प्रमाणे गुरुदक्षिणा विद्यार्थ्याने द्यावयाची असे. या गोष्टींचा अर्थ असा की, शिक्षणाची आर्थिक जबाबदारी हे राजाचे, शासनव्यवस्थेचे कर्तव्य होय. आश्रमभूमीचे पावित्र्य, तेथील वनस्पती, पशु, पक्षी यांच्या संरक्षणाची हमी इत्यादी गोष्टी पाहाता, विद्यापीठे चाल-विणाऱ्या ऋषिमुनींना आणि तापसांना राजाने जमिनी तोडून दिलेल्या असत आणि तेथील नैसर्गिक आणि इतर उत्पन्नावर आश्रम--विद्यापीठाचा प्रपंच चालत असे, असे अनुमान केले पाहिजे. याशिवाय, आश्रमाची जमीन आणि तेथील रहिवासी करमुक्त असत हेही लक्षात घेतले पाहिजे. शकुन्तलेच्या पाहाण्यासाठी आश्रमात पुन्हा

जाता यावे म्हणून दुष्यन्त विदूषकाला जेव्हा काही सबब शोधून काढायला सांगतो आणि विदूषक करवसुलीची कल्पना सांगतो तेव्हा दुष्यन्त त्याचा निषेध करून म्हणतो : हे तापस आपल्या पुण्याचा एकषष्ठांश भाग मला देत असतात. याहून अक्षय असे धन काय असू शकेल ! ( शाकुन्तल, २·१३ ) दुष्यन्ताच्या या उद्गारात कृतज्ञतेची, कृतार्थतेची जशी भावना आहे, तसेच ऋषिमुनींना आणि तापसांना कर देण्याचा कायदा लागू नव्हता हेही स्पष्ट आहे. इतकेही करून गरीब विद्यार्थ्यांना गुरुदक्षिणा देता येण्याचे सामर्थ्य नसेल तर राजे त्यांना हे दान देत, ही गोष्ट रघुवंशातील कौत्साच्या कथेवरून कळून येतेच. भासाच्या स्वप्नवासवदत्त नाटकात, मगध राजकुमारी पद्मावती राजमातेला भेटून राजधानीकडे परत येत असता, वाटेत तपोवनामध्ये मुक्काम करते; त्या वेळी तिच्या वतीने कांचुकीय दान देण्याची घोषणा करतो; त्यात ऐहिक अडीअडचणींबरोबर गुरुदक्षिणे-साठी अडलेल्या विद्यार्थ्यांचाही उल्लेख आहे ( स्वप्नवासवदत्त,१ ८). तेव्हा राजे, राजकुटुंबातली मंडळी आणि राज्यातील सधन माणसे शिक्षणाचा आर्थिक भार सर्वतोपरी उचलीत असत, असे म्हणावयास हरकत नाही.

अशा रीतीने तत्कालीन शिक्षण ही राज्यशासनाची जबाबदारी होती. लोकांच्या दृष्टीने ते मुक्त होते. मात्र या व्यवस्थेत विद्यादान करणाऱ्या गुरूचे जसे अधिकार तशी त्याने उचललेली नैतिक जबाबदारीही फार मोठी होती, असे आपल्याला दिसून येईल. मालविकाग्निमित्र नाटकात हरदत्त आणि गणदास यांच्या भांडणाच्या निमित्ताने काही स्पृहणीय विचार कालिदासाने प्रकट केले आहेत.

गणदास म्हणतो : आचार्यांना आपल्या कुलविद्येबद्दल सार्थ अभिमान धारण पाहिजे. शिष्याविषयी गौरवाची भावना [illegible]

आत्मगौरव. अनेक लोक मान मानाचे स्थान एकदा प्राप्त झाले म्हणजे ते सांभाळून कसे ठेवता येईल एवढ्याच चिंतेत असतात! एखाद्या प्रतिस्पर्ध्याने त्याच्याशी वाद घालायला सुरुवात केली तर आपल्या बुद्धीचे तेज प्रकट करण्याच्याऐवजी ते वादविवादालाच बगल देऊ पाहतात; आणि दुसऱ्याने केलेली निन्दा किंवा टीका न ऐकल्या-सारखे दाखवितात. ही वृत्ती क्षुद्र स्वार्थाची आहे. विद्येचा उपयोग ज्ञानाचा प्रकाश फैलावण्यासाठी व्हावा; तो न होता, असे लोक आपल्या संपादित मानाच्या आड किंवा अधिकाराच्या स्थानाच्या आड दडू लागले तर मग त्यांची विद्या म्हणजे पोट भरण्याचे एक साधन होय, असे म्हटल्यावाचून गत्यंतर नाही असे लोक आचार्य नव्हेत; ज्ञानाचा व्यापार करणारे व्यापारी होत! 'आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कुतश्चन।' या उपनिषद्वचनाचा व्यावहारिक अर्थ असाच केला पाहिजे की, खरा ज्ञानी मनुष्य निर्भय असतो, ज्ञानाला डर नसते.

सोन्याचे काय होते हे मला माहीत नाही ). ज्ञानाची परीक्षा ही अग्निपरीक्षा आहे. ह्या अग्निपरीक्षेत ज्याचे ज्ञान आणि कौशल्य विशुद्ध राहिले तो या परीक्षेत उत्तीर्ण झाला.

ज्ञानग्रहण आणि ज्ञानदान या भिन्न गोष्टी आहेत. त्यांना लागणारी बुद्धीची शक्ती आणि कुशलता भिन्न आहेत. एखादा चांगला सुशिक्षित असूनही आपले ज्ञान योग्य रीतीने प्रकट करण्याचे किंवा दुसऱ्याला ज्ञान देण्याचे कौशल्य त्याच्या अंगी असेलच असे म्हणवत नाही या दृष्टीने शिक्षकांचे दोन वर्ग पडतात : काहींचे आपल्या विषयाचे ज्ञान खोल असते, चतुरस्र असते, पण त्यांना चांगले शिकविता येत नाही. उलट, काही शिक्षकांची ज्ञान संक्रान्त करण्याची म्हणजे दुसऱ्याला शिकविण्याची हातोटी विलक्षण प्रभावी असते; आणि मग या वैशिष्ट्याबद्दल वाटणाऱ्या आदरामुळे त्यांच्या बुद्धिमत्तेचे वा ज्ञानाचे माप घेण्याचे भानच उरत नाही. पंडितकौशिकीच्या म्हणजे पर्यायाने कालिदासाच्या मते हे दोन्ही प्रकारचे शिक्षक आदर्श शिक्षक नाहीत. ज्याचे आपल्या विषयाचे ज्ञान परिपक्व आहे आणि ज्याची शिकविण्याची कलाही अपूर्व आहे, म्हणजे वरील दोन्ही विशेष ज्याच्या अंगी एकवटलेले आहेत, त्यालाच शिक्षकांच्या अग्रभागी नेऊन बसविता येईल, असे कालिदासाचे म्हणणे आहे.

शिक्षकाच्या ठायी अशा आदर्शाची अपेक्षा करणारा कालिदास शिष्याकडूनही काही गुणांची अपेक्षा करतो, हे आवर्जून सांगायला हवे. गुरू विद्वान आणि शिकविण्यात निष्णात असूनही त्याला योग्य शिष्य मिळाला नाही तर त्याच्या विद्येचे तेज प्रकटणार तरी कसे ! पर्जन्यबिन्दू स्वाती नक्षत्रावर समुद्रामधल्या शिंपेत पडला तरच त्याचे मोती बनते, एरवी नाही. त्याचप्रमाणे शिष्य सत्पात्र असला तरच गुरूने दिलेली विद्या त्याच्या ठायी विशेष तेजाने चमकून

उठते. याचा अर्थ असा की, शिष्य 'पात्रविशेष' असल्यावाचून गुरूने त्याला विद्या देण्यात काही स्वारस्य नाही. तत्कालीन समाज-रचनेत आणि गुरुकुल शिक्षणपद्धतीत गुरूची ही इच्छा वा आग्रह याना अर्थ होता. शिष्याची कसोटी घेतल्यावाचून, त्याची ज्ञानाची तळमळ अजमावल्यावाचून, त्याला ज्ञान न देणाऱ्या आचार्यांची उदाहरणे उपनिषद्कालात किती तरी आढळून येतात. प्रस्तुत काळी गुरूला हा अधिकार राहिलेला नाही. शुल्क, फी, एवढीच एक मुख्य कसोटी आज आहे.

कालिदासाच्या विचारसरणीत गुरूच्या अधिकाराबरोबर शिष्याचाही एक अधिकार मानलेला आहे. मिळालेले ज्ञान पूर्णतया मुरल्यावाचून त्या ज्ञानाचे विद्या कलेचे प्रदर्शन करायला लावणे, म्हणजे परीक्षा घ्यायला लावणे अन्यायाचे आहे, हे तत्त्वही त्या वेळी मान्य होते. शिष्याचे पालकही या तत्त्वाविषयी जागरूक असत. मालविकेने नुकतेच शिकविलेले नृत्य जाहीरपणे करून दाखविण्याला राणी धारिणीने जो आक्षेप घेतला आहे त्यावरून हे स्पष्ट आहे. अर्थात शिष्याची तयारी किंवा आहे हे त्याने ठरविण्यापेक्षा गुरूला त्याच्याबद्दल किती विश्वास वाटतो हे अधिक महत्त्वाचे आहे. 'अपरिनिष्ठित' उपदेशाचेही प्रदर्शन करण्याचा गणदासाने आग्रह धरला याचा अर्थ, त्याला आपल्या शिष्येबद्दल खात्री आहे, असाच केला पाहिजे.

अशी खात्री एखाद्या शिष्याबद्दल गुरूला वाटावी याद तत्कालीन शिक्षणपद्धतीचे एक धोरण गुंतलेले आहे. मन्दबुद्धीचे म्हणजे विशेष अभ्यासक्रम पुरा करण्याची योग्यता नसलेले विद्यार्थी गुरू निवडीतच नसत. त्या त्यांना अधिकार होता. म्हणूनच राणी धारिणी जेव्हा विचारते, 'एखाद्या मंदमेधा शिष्येने उपदेश विद्रूप टाकला तर तो काय आचार्याचा दोष?' तेव्हा गणदास विश्वासपूर्वक होकार देतो; कारण, 'अयोग्य शिष्याची निवड करण्यातच गुरूच्या बुद्धीचा कमी-

पणा दिसून येतो' हे त्याला मान्य आहे. तत्कालीन आचार्यांचा शिष्य निवडण्याचा हा आग्रह आज निकामी आहे, हे सांगावयास नकोच. संगीतादी कलांच्या क्षेत्रात या आग्रहाला कदाचित अद्यापिही वाव असेल, पण सामान्य शिक्षणाच्या आणि ज्ञानदानाच्या बाबतीत ही कसोटी आज उरलेली नाही. ज्ञानाचे पावित्र्य आणि उंची कायम राखण्यासाठी एखाद्या शिक्षकाने अशा काटेकोरपणाचा अधिकार गाजविण्याचे ठरविले तर शिक्षणसंस्था, पालक आणि सरकार सारेच त्याच्याविरुद्ध काहूर उठवितील आणि बिचाऱ्याला नोकरीलाच मुकावे लागेल! आणि असे झाले नाही तरी आजच्या विद्यार्थ्यांना अशा स्वाभिमानी शिक्षकाचे भय नाही, पर्वा नाही. नियमित धार घालणारे ज्ञानाचे नळ कोचिंग क्लासेस आणि 'गाइड्स' यांच्या रूपाने जागोजाग उभे आहेत, कुठेही तोंड लावावे! या परिस्थितीत, 'नालायक विद्यार्थी निवडण्यात शिक्षकाच्या बुद्धीचा कमीपणा दिसून येतो' हा कालिदासाचा ज्ञानदण्ड आज कशा कामी यावा? सवंग आणि बेजबाबदार विद्यार्थ्यांच्या परीक्षेतील अपयशाचे खापर असहाय शिक्षकाच्या डोक्यावर फोडण्यासाठी फार तर या दण्डकाचा उपयोग होईल!

## [७]

करुणेच्या संदर्भात काही मोजकेच विचार कालिदासाच्या साहित्यात प्रकट झाले आहेत. रघुवंशात आलेल्या रामायण कथेमध्ये वाल्मीकी संबंधाने कालिदासाने म्हटले आहे :

निषादविद्धाण्डजदर्शनोत्थः श्लोकत्वमापद्यत यस्य शोकः।

कालिदासाचे हे उद्गार आणि आनन्दवर्धनाने ध्वन्यालोकामध्ये काव्याचा अर्थ किंवा आशय सांगताना जे म्हटले आहे—

काव्यस्य स एवार्थस्तथा चादिकवेः पुरा ।
क्रौञ्चद्वन्द्ववियोगोत्थः शोकः श्लोकत्वमागतः ॥

याचे साम्य सहज दिसून येणारे आहे. आनन्दवर्धन ( इ. स. ९ वे शतक ) कालिदासाच्या नंतर झाला हे लक्षात घेतले म्हणजे तो कालिदासाच्या शब्दांचे अनुकरण करीत आहे असे वाटल्यावाचून राहात नाही. आनन्दवर्धनाच्या उद्‌गारात रसध्वनीचे तत्त्व आहे, हे त्याच्या आणि अभिनवगुप्ताच्या लोचनटीकेवरून स्पष्ट आहे. काव्याच्या निर्मितीची आणि अभिव्यक्तीची प्रक्रिया यात अभिप्रेत आहे. काव्यानुभव हा सौंदर्यानुभव आहे. त्याचे ग्रहण कवीला होते ते भावनिक्षेमधून. म्हणूनच एका पक्षाच्या विलापाने वाल्मीकींचे हृदय हेलावून गेले. अशी अनुभूती प्रबल झाल्यावर तिची अभिव्यक्ती होते, तीही सुचित मार्गाने, ध्वनीने, आणि भावनेचे रंग घेत, भावनेतूनच फुलत. सौंदर्यानुभवाचे हे स्वरूप आनन्दवर्धन इथे सांगत आहे. आणि ज्या अर्थी कालिदासाने हेच उद्‌गार अगोदरच काढलेले आहेत, त्या अर्थी सौंदर्यानुभूतीवर अधिष्ठित असे जे ध्वनिकाव्याचे स्वरूप आहे त्याची कवी म्हणून त्याला पक्की समज होती, असे म्हणावयास हरकत नाही. कालिदासाचे साहित्य ध्वनितत्त्वाची प्रतीती आणून देते हे तर आपण जाणतोच.

रघुवंशाच्या आरंभी पार्वती-परमेश्वराला वंदन करताना त्यांचे रूप 'वागर्थाविव' संपृक्त असल्याचे कालिदास म्हणतो. ही उपमा उलटी करून घेतली तर आपल्याला असे म्हणता येईल की, काव्यातील शब्द आणि अर्थ हे शिव पार्वतीप्रमाणे एकमेकांना चिकटलेले आहेत; ते वेगळे करता येणार नाहीत. म्हणजे, साहित्याच्या प्रान्तात शब्दावाचून अर्थ नाही आणि अर्थ हा शब्दाला सोडून असणार नाही; असे शब्दार्थांचे साहित्य–सहितता– येथे अभिप्रेत आहे. पण इतकेच नाही.

शब्द आणि अर्थ साहित्यकलेला अनिवार्य आहेत. तरीही ' शब्दार्थौ सहितौ काव्यम् ' इतकीच भूमिका घेऊनही चालणार नाही. शब्द आणि अर्थ जर एकमेकांपासून विभक्त नाहीत तर अर्थाचा, काव्यार्थाचा विचार न करता, केवळ शब्दांशी खेळत बसणे हेही कलेच्या भूमिकेत योग्य होणार नाही. असा मोह कवींना होतो. आणि मग ते अनुप्रास, यमक, चित्रबंध असे शब्दांचे खेळ करीत बसतात. कालिदासही या मोहातून सर्वस्वी सुटला नाही. रघुवंशाच्या नवव्या सर्गात यमक आणि अनुप्रास साधीतच त्याने काव्यरचना केली. मात्र हा मोह त्याने लगेच आवरला हेही दिसते. पुढील संस्कृत साहित्यात, महाकाव्यात, शब्दनिष्ठ रचना आणि चित्राकृतींचे शब्दबंध यामध्ये पंडित कवींना धन्यता वाटू लागली. त्याचा परिणाम साहजिकच असा झाला की काव्यातील अर्थ घटला; काव्याचे काव्यत्व गेले, उरल्या त्या शब्दचमत्कृती. असे काव्य कनिष्ठ प्रकारचे असते, हा संस्कृत काव्यशास्त्रज्ञांचा अभिप्राय आहे. त्यामुळे कलेचे स्वरूप आणि कलावंताची जबाबदारी याविषयी कालिदासाला असलेली जाणीव महत्त्वाची वाटते.

नाट्याविषयी, मालविकाग्निमित्र नाटकातील नाट्याचार्य गणदास याने, काही विशेष विचार प्रकट केले आहेत. नाट्याला येथे ' चाक्षुष क्रतु ' म्हटले आहे. नाट्य, नाट्यप्रयोग, डोळ्यांनी पाहून त्यातील आनंद घ्यावयाचा असतो हे तर इथे सुचविलेले आहेच; पण नाट्याला यज्ञ म्हणण्यात यज्ञाची भव्यता, वैभव, पवित्रता, एका पूर्तीसाठी अनेकांना एकत्र आणण्याचा धर्म, मोठ्यांपासून लहानापर्यंत वेगवेगळ्या पातळीवरील व्यक्तींना एकत्र जोडणारा दुवा, असा अनेक कल्पनाही सूचित आहेतच. संस्कृत नाट्याची उत्पत्ती कदाचित नृत्यापासून झाली असेल; निदान कालिदास तरी इथे सुचवीत आहे

की शिवपार्वतीच्या ताण्डव आणि लास्य या नृत्यरूपात नाट्य विभक्त झाले आहे. सामान्य माणसाच्या दृष्टीने तर नाट्याइतके मनाला समाधान देणारे दुसरे साधन नाही. चित्रविचित्र मानवी जीवन नाट्यात प्रतिबिंबित झालेले असते; आणि नाट्य ही एकच अशी कला आहे की जिच्यामध्ये साहित्य, नृत्य, संगीत, अभिनय, शिल्प, स्थापत्य अशा अनेक कला एकत्र आलेल्या आहेत; आणि त्यामुळे अत्यंत भिन्न प्रवृत्तींची माणसेही एकत्र येऊन आपापल्या परीने तिचा अनुभव घेऊ शकतील अशी नाट्याइतकी दुसरी कला नाही.

त्याचबरोबर 'प्रयोगप्रधान हि नाट्यशास्त्रम्' असे जे पंडित-कौशिकी मालविकाग्निमित्र नाटकात म्हणते त्याचाही अर्थ लक्षात घेतला पाहिजे. नाट्याला भरताने 'दृश्यकाव्य' म्हटले आहे. नाट्य हे काव्य म्हणजे साहित्य आहेच; पण ते प्रयोगाने साकार झाल्या-शिवाय त्याला सार्थकता नाही. आणि प्रयोग म्हटला म्हणजे प्रयोगाची, अभिनयाची, दर्शनाची जी अंगे आहेत त्यांचा विसर नाटककाराला पडता कामा नये. नाट्यलेखनात 'काव्य' फार झाले आणि त्याची प्रयोगक्षमता निसटली तर असे नाटक प्रबंध होईल, नाट्य ठरणार नाही. पुढील संस्कृत साहित्यात नाटकातील नाट्यच नाहीसे झाले; कवींच्या पाडित्याचा, संकेतबद्ध रचनेचा, तो एक प्रकार ठरला; आणि संस्कृत नाट्यसाहित्याला अधोगती प्राप्त झाली. हा इतिहास आहे. कालिदासाने या दोन्ही अंगांचा समतोल साधला हे त्याच्या नाट्याचे यश. नाटकाच्या स्वरूपाबद्दल त्याची कलात्मक जाणीव निश्चित होती, हेही यावरून दिसते.

शाकुन्तल नाटक सादर करताना सूत्रधार म्हणतो, 'आ परितोषात् विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्।' जाणत्यांचा संतोष हेच प्रयोगसिद्धीचे, यशस्वी नाट्यरचनाचे चिह्न आणि पारितोषिकही. शाकुन्तलासारखे नाटक प्रेक्षकांपुढे ठेवताना कालिदासाने हे उद्गार

काढावेत यात त्याचा विनय दिसून येतो, असे आपण साधारणपणे मानतो. ते खरेच आहे. परंतु साहित्यिक दृष्टीने या उद्गाराचा आणखीही एक अर्थ शक्य आहे. नाट्य किंवा साहित्य यांच्या सिद्धीची कसोटी जाणत्याच्या पुढे लागावयाची. म्हणजे साहित्य हे केवळ कलावंताचे आत्मप्रकटीकरण नाही, ते निवेदनही आहे (Literature is not self expression only, it is a communication also) आणि म्हणूनच आस्वादकतेचे आणि समीक्षेचे म्हणून जे काही दण्डक किंवा संकेत असतात, त्यांची उपेक्षा करता येत नाही. प्रतिभावान लेखक स्वत:चे नवे संकेत निर्माण करील, नवे प्रयोग करून नव्या प्रथा पाडील, यात शंका नाही, पण साहित्य हे जितके लेखकाच्या आत्मसमाधानासाठी असेल तितकेच ते इतरांच्या, वाचकांच्यासाठीही आहे, असेही म्हटले पाहिजे. कालिदासाच्या वरील उद्गारात ही जाणीवदेखील असावी.

[८]

जीवनाच्या विविध अंगासंबंधी कालिदासाचे विचार इतका वेळ जे तपासून पाहिले त्यावरून सकल्पितपणे कालिदासाची जीवननिष्ठा आणि जीवनाबद्दलचा त्याचा दृष्टिकोण आपल्यासमोर स्पष्ट व्हावा. धर्म आणि धार्मिक तत्त्वज्ञान, सामाजिक कायदे आणि त्याविषयीची तात्त्विक वैचारिका, या सर्वासंबंधी कालिदासाची भूमिका स्वीकृतीची आहे. ज्या ऐतिहासिक पार्श्वभूमीवर कालिदासाचे साहित्य निर्माण झाले असे आपण मानले आहे, त्या परिस्थितीत ही भूमिका कदाचित अपरिहार्य असावी, आवश्यकही असावी. आणि तरीदेखील कालिदासाची वैयक्तिक निष्ठा त्यातून प्रकट झाल्यावाचून राहाणार

नाही. कालिदासाच्या वृत्तीला बंडखोरी किंवा सवतें मानवत नाही असे दिसते. शान्ती आणि स्वास्थ्य त्याला प्रिय आहेत. त्याच्या साहित्यातून हेच प्रतिबिंब डोकावते. म्हणूनच धार्मिक किंवा सामाजिक विषमतेकडे, अन्यायाकडे त्याने डोळेझाक केली किंवा जाणूनबुजून ही द्वंद्वे टाळली. धार्मिक आणि सामाजिक तत्त्वज्ञानाने जीवनाची जी चौकट आखून दिली त्या चौकटीच्या आत राहूनच जीवनाचा उपभोग आणि आनंद घेता येईल असा त्याचा विश्वास दिसतो.

मात्र ही भूमिका पराभूतीची आहे असे मी म्हणणार नाही. कारण, राज्यशासनाचे आणि मानवाच्या सामाजिक जीवनाचे काही निश्चित आदर्श कालिदासाने मानलेले आहेत. वास्तविक जीवन जगत असताही हे आदर्श, ही नैतिक मूल्ये मानवाचे जीवन उन्नत करण्याइतके प्रभावी आहेत ही श्रद्धा येथे आहे.

जीवनाकडे शान्तिसमाधानाच्या आणि आनंदी वृत्तीने पाहाण्याची कालिदासाची जी वृत्ती आहे त्याला आगळाच काही अर्थ आहे. विरागी आणि मध्यस्थ वृत्तीचा आदर करणारे तत्त्वज्ञान, मान म्हणून फार उच्च किंबहुना निरपवाद असले तरी सामान्य दैनंदिन मानवी जीवनाच्या दृष्टीने ते जीवनाबद्दली अनादर उत्पन्न करणारे आहे, हे आपल्याला मान्य करावेच लागेल. अशा वृत्तीने माणूस जीवन जगू लागला तर जीवनाचा उदासपणा वाटेल आणि जीवनाच्या आनंदालाही माणूस पारखा होईल. कालिदासाची ही वृत्ती नाही आहे. म्हणूनच तर त्याने धार्मिक तत्त्वचिंतनेच्या दृष्टीने स्वीकारताना आणि मोक्ष-धर्मांचा तात्त्विक पाठपुरावा करताना, स्मृतिनिगडित धर्मांचा आदर केला आणि आश्रमव्यवस्थेचे आदर्श राजेही पाळत, असे आपल्या साहित्यातून मुद्दाम सुचविले. वयाच्या अवस्थेप्रमाणे आचरणीय कर्तव्ये आहेत, आणि त्या त्या आश्रमाचे काही उपभोगही आहेत. या सर्व

अवस्था पुरेपूर जगण्यातच जीवनाची कृतार्थता आहे, असे कालिदास सुचवीत आहे.

ही भूमिका कलात्मक आणि सर्जन प्रवृत्तीलाही आवश्यक आहे असे आपल्याला दिसून येईल. जीवनाचा अव्हेर करणारी व्यक्ती जीवनाचा परिपूर्ण अर्थ लावू शकेल की नाही, याबद्दल शंका वाटते. जीवनाचे सूत्र जाणणारा दार्शनिक तत्त्वज्ञाने निर्माण करील, कला नाही. कलानिर्मितीसाठी जीवनाचे भाष्यकार व्हायला हवे, त्यासाठी जीवनाच्या अंगोपांगाचा सूक्ष्म अभ्यास हवा; आणि हा अभ्यास जीवन परिपूर्ण भोगल्यावाचून पुरा होण्याचा संभव नाही. या भूमिकेत जीवनाचे परम तत्त्वज्ञान जसे समाविष्ट आहे, तसा जीवनाचा भोगही गुंवलेला आहे. कलावंताला तरी या भोगाचा, उपभोगाचा अव्हेर करून चालणार नाही.

पण मग, या भूमिकेवर आपण आरपार जीवनाच्या दैनंदिन क्रमातही, रात्रिंदिनक्रमातही, केवढे सौंदर्य आणि आनंद आहे याची जाणीव आपल्याला होऊ शकेल पारमार्थिक अर्थाने जीवनाची निवृत्ती— मोक्षसुख— जीवनाच्या पलीकडे पुढे तरी असेल. पण कलेच्या भूमिकेवर हा स्वर्ग, हे सुख पृथ्वीवरच आहे. स्वर्गाहून पृथ्वीकडे परत येत असता दुष्यन्त हेमकूट पर्वतावर थांबतो त्या वेळी मारीच ऋषींचा आश्रम पाहून तो म्हणतो ' स्वर्गाहूनही अधिक सुखप्रद असे हे स्थान आहे. मला तर अमृताच्या सरोवरात बुडून गेल्यासारखे वाटते आहे ! स्वर्ग आणि पृथ्वी दोन्ही पाहिलेल्या दुष्यन्ताचे हे उद्गार आहेत. पण यापेक्षाही महत्त्वाचा उद्गार मातलीचा आहे. हा इन्द्रसारथी तर स्वर्गाचा रहिवासी, पण दुष्यन्ताला परत पोचविण्यासाठी स्वर्गीय रथातून अवकाशातील वायुमंडले उतरत उतरत पृथ्वीकडे येत असताना त्याला पृथ्वीचे जे दर्शन घडते त्याने आनंदून तो म्हणतो : अहाहा ! किती भव्य आणि सुंदर ही पृथिवी !

\ पृथ्वीवरच स्वर्ग असल्याचा हा प्रत्यय कलेने दिला नाही तर तुम्हा-आम्हाला जीवन नीरस आणि निरर्थ होईल. कालिदासाच्या मर्यादेतही हा साक्षात्कार आहे, हे महत्त्वाचे.

• • •

[ १ ]

कालिदासाचे विचार समजावून घेताना त्याच्या जीवनदर्शनाचा शोध घेण्याचा प्रयत्न होता. या विवेचनात कालिदासाचे प्रीतिविषयक विचार आपण पाहिले नाहीत. याचे कारण हे विवेचन स्वतंत्रपणे करता येण्यासारखे आहे, कालिदासाची कला समजण्यासाठी आवश्यकही आहे.

कालिदासाला शृंगाराचा राजा म्हणता येईल. शृंगार हा सर्व रसां मध्ये रसराज, आणि त्याला 'रसिकोद्धार' देणारा काव्य-देवीचा 'विलास' असा हा कालिदास. त्याच्या दोन काव्यांचा आणि तीनही नाटकांचा विषय प्रणय आहे. ऋतुसंहार या खंडकाव्यात मुख्यतः निसर्गवर्णन असले तरी तेही ऋतूंचा मानवी मनोभावनांवर होणारा परिणाम हाच हे दाखवताना मांडलेल्या आणि प्रणयाच्या छटा प्रकट झाल्यावाचून राहिलेल्या नाहीत रघुवंशातही इतिहासासह राजचरिताचे

# [ १ ]

कालिदासाचे विचार समजावून घेताना त्याच्या जीवनदृष्टीचा शोध घेण्याचा प्रयत्न होता. या विवेचनात कालिदासाचे प्रीतिविषयक विचार आपण पाहिले नाहीत. याचे कारण हे विवेचन स्वतन्त्रपणे करता येण्यासारखे आहे, कालिदासाची कला समजण्यासाठी आवश्यकही आहे.

कालिदासाला शृंगाराचा राजा म्हणता येईल. शृंगार हा सर्व रसांमध्ये रसराज, आणि त्याला 'लम्बितोद्धार' देणारा काव्य–देवीचा 'विलास' असा हा कालिदास. त्याच्या दोन काव्यांचा आणि तीनही नाटकांचा विषय प्रणय आहे. ऋतुसंहार या खण्डकाव्यात मुख्यतः निसर्गवर्णन असले तरी सहा ऋतूंचा मानवी भावभावनांवर कसा परिणाम होतो हे सांगताना भावनेच्या आणि प्रणयाच्या छटा प्रकट झाल्यावाचून राहिलेल्या नाहीत. रघुवंशातही इतिहाससदृश राजचरित्राचे गुणगान असले तरी दाम्पत्यप्रेमाचे, प्रसंगी विलासाचे दर्शन झाल्यावाचून राहात नाही. याचा अर्थ असा की, शृंगार किंवा प्रणय हा कालिदासाच्या वाङ्मयाचा स्थायी भाव आहे.

कालिदासाचे हे प्रणयदर्शन पाहाताना त्यासंबंधीच्या काही आक्षेपांचा विचार प्रथमच करणे बरे. हे आक्षेप दोन–तीन तऱ्हेने येतात. एक टीकाकारांचा वर्ग मोठा आहे. जीवनात अनेक इतर गोष्टी असताना शृंगाराचेच वर्णन काय करीत बसायचे, असे याचे

म्हणणे असते. विशेषतः, शृंगार आणि त्याची उपजीव्य मूर्ती स्त्री ही अध्यात्माच्या दृष्टीने अडथळ्यासारखी असताना आणि जीवनाचे ध्येय परमेश्वर प्राप्ती, मोक्षसुख हे असताना, त्या मोक्षमार्गाच्या आड येणारी वाङ्मयी कला अप्रयोजकच म्हटली पाहिजे असे या टीकाकाराना वाटते. हा आक्षेप प्रामाणिक असावा. पण केवळ संस्कृत वाङ्मया-पुरता किंवा कालिदासापुरता तो मर्यादित नाही; तो कोणत्याही काळी, कोणत्याही देशात, निर्माण होणाऱ्या प्रणयप्रधान वाङ्मयाविषयी घेता येण्यासारखा आहे. केवळ कलात्मक भूमिकेवरून या आक्षेपाला मुद्दाम उत्तर देण्याचे कारण नाही. ज्याना प्रणयप्रधान वाङ्मयाबद्दल अरुची आहे त्याना इतर वाङ्मय, थोर पुरुषांची आदर्श चरित्रे, सच्चरित्रे आणि अध्यात्मपर ग्रंथ वाचण्याची पूर्ण मुभा आहे. मुद्दा एवढाच की, प्रणय हा सर्व जगातील सर्व काळी निर्माण होणाऱ्या साहित्याचा फार मोठा आणि आवश्यक असा भाग आहे. कलावंताने प्रणयाचे चित्रण करू नये असे सांगण्याचा आपल्याला अधिकार नाही. जगात पहिली स्त्री आणि पहिला पुरुष निर्माण झाला तेव्हा ही प्रणय-भावनादेखील अस्तित्वात आली; आणि पृथ्वीवर मानव असेपर्यंत ती राहाणार आहे. या अर्थाने प्रणयासारखा सनातन विषय दुसरा नाहीच. तेव्हा वरील आक्षेपाचा प्रामाणिकपणा मान्य करून, कलेच्या क्षेत्रात ( आणि कदाचित वैयक्तिक जीवनातही ) आपण स्वस्थ बसणे हेच योग्य आहे.

असाच दुसरा आक्षेप आहे तो प्रणयचित्रणाला नाही तरी त्यातील अतिरिक्त चित्रणाला, उत्तानपणाला आहे. हा आक्षेप प्रामाणिक किंवा ढोंगी दोन्ही तऱ्हेचा असू शकेल असे मला वाटते. या आक्षेपात ढोंगीपणा येतो तो असामुळे की प्रणयप्रधान वाङ्मयाचे हे रसिक व टीकाकार असे वाङ्मय गुप्तपणे वाचीत असतात, मनातल्या मनात त्याना भिटक्या

मार्गात त्याचा आस्वाद घ्यावासा वाटतो; परंतु उघडपणे तसे मान्य करण्याचे त्यांना धैर्य तरी नसते, किंवा ज्या सभ्य संस्कृतीचे उत्तरीय त्यांनी अगत्याने घेतले असते ती तथाकथित सभ्य संस्कृती त्यांना तसे बोलावयास लावते. अशा ढोंगीपणा या भूमिकेत असल्यास, त्याला उत्तर एवढेच की मनुष्य हा प्रणयप्रिय आहेच, त्याच्या ज्या मर्यादा म्हणून आहेत त्या कालाप्रमाणे आणि सांस्कृतिक परिवर्तनामुळे बदलू शकतात, तेव्हा एका व्यक्तीला अतिरिक्त वाटणारी गोष्ट दुसऱ्या व्यक्तीला तशी वाटलीच असे नाही. ही तात्त्विक भूमिका घेणारांना ढोंग करण्याचेही कारण नाही. नीती आणि वैराग्यशतक लिहिणारा भर्तृहरी ज्यांना अधिक प्रिय असेल, कवी म्हणून मोठा वाटत असेल, त्यांनी हेही लक्षात ठेवावयास हवे की याच भर्तृहराने शृंगाराची 'उधळण' लावलेली आहे.

मात्र उत्तान विषयावरील आक्षेप निःसंशय कलात्मक अशा भूमिकेवर घेतल्यास त्याचे समीक्षामूल्य महत्त्वाचे आहे यात शंका नाही. हा आक्षेप बऱ्याच साहित्यावद्दल— संस्कृत काव्य आणि नाट्यसाहित्य यांत आढळेल— घेता येईल. कालिदासाचीही या आरोपातून सुटका होण्यासारखी नाही. कुमारसंभवाच्या आठव्या सर्गात शिवपार्वतीच्या समागमशृंगाराचे कालिदासाने मुक्त वर्णन केले आहे. याबद्दलची अरुची परंपरेच्या टीकेतही प्रकट झाली आहे, आणि अशा टीकेमुळेच कालिदासाने हे महाकाव्य आठव्या सर्गावर सोडून दिले असा प्रवाद आहे. 'प्रवाद' अशाकरिता म्हटले की हे मत मला मान्य नाही 'कुमारसंभव' या नावातच जो काय विषय सूचित आहे तो पाहावा, आणि ध्वनितत्त्वाला अनुसरणारी कालिदासाची वाङ्मयी कला ध्यानात घेता, हा विषय शिवपार्वतीच्या प्रणयमीलनातच पर्याप्त आहे असे मला वाटते. या प्रणयमीलनातून उत्पन्न झालेले अपत्य आणि त्याचा पराक्रम वर्णन करून कथा वाढवायची

म्हटल्यास ते कुमारसंभव नव्हे, 'कुमारचरित' किंवा 'शिवचरित्र' काव्य होईल. मूळ मुद्याचा विचार करताना आपल्या लक्षात येते की, सर्वच प्राचीन टीकाकाराना हे वर्णन गर्ह्य वाटलेले नाही. आनन्दवर्धनासारखा मातबर काव्यशास्त्रज्ञ म्हणतो,

> महाकवीनां अपि उत्तमदेवताविषयप्रसिद्धसम्भोगशृङ्गारादि अनौचित्य शक्तितिरस्कृतत्वाद् ग्राम्यत्वेन न प्रतिभासते। यथा कुमारसम्भवे देवीसम्भोगवर्णनम्।
>
> (ध्वन्यालोक, उद्योत ३)

आनन्दवर्धनाचा अभिप्राय असा आहे की कवीच्या काव्यवर्णनात दोन तऱ्हेचे दोष असू शकतात. कवीचे, कवी म्हणून जे रचनासामर्थ्य असते ते कमी पडल्यामुळे होणारे दोष, आणि त्याची निर्माणशक्ती, प्रतिभा, हीच तोकडी पडल्यामुळे आलेले दोष. रचनेचे, भाषेचे, दोष प्रतिभेने झाकले जातात; प्रतिभेची उणीव मात्र कशानेच झाकता येण्यासारखी नाही. कालिदासाच्या वर उद्धृत केलेल्या वर्णनात ग्राम्यता भासत नाही, याचे कारण त्याची अलौकिक प्रतिभा. कालिदासाच्या अपूर्व काव्यशक्तीमुळे, सामान्य कवीच्या हाती ज्याला ओंगळपणा आला असता असे हे संभोगवर्णन वाङ्मयी कलेने उजळून निघाले आहे.

या चर्चेतले साहित्यिक तत्त्व आनन्दवर्धनानेच स्वतः पुढे स्पष्ट केले आहे. हे तत्त्व म्हणजे औचित्य. औचित्यभंगासारखा दुसरा दोष नाही. रतीचे वर्णन करायचे म्हटले तरी 'सुरत' हा एकच रतीचा प्रकार आहे असे थोडेच आहे ? परस्पर प्रेमदर्शनाचे अनेक प्रकार कवीला कल्पिता येतील. त्यांच्यात रम्यता आहे, आणि वाच्य-रूपाने रसदर्शनाला आनंद देण्याचे सामर्थ्यही आहे. हे औचित्य कवींनी पाळायास हरकत नाही. अशा विषयात महाकवीदेखील काही

## २२ हंसजातकम् ।

न विस्मयेनास्त्वपि या जितात्मनि
प्रजाहितार्थं नृपपार्थिवात्मजे ।
तपःसमाधानपरे मुनाविव
समाश्रयत्वा हि गुणास्त्वपि स्थिताः ॥ १२ ॥

इति प्रशंसासुभगाः शुभा गुणा
न दोषदुर्गेषु रमन्ति भूतयः ।
इमां विदित्वा गुणदोषधर्मतां
सचेतनः कः स्खलितोपयं भजेत् ॥ १३ ॥

न देशमाप्नोति पराक्रमेण तं
न कोशवीर्येण न नीतिनिर्भरता ।
श्रमान्वयाभ्यां नृपतिर्विनैव यं
गुणाभिजातेन पथाधिगच्छति ॥ १४ ॥

सुराधिपश्रीरपि वीक्षते गुणान्
गुणोदितानेव परैति सर्वतः ।
गुणेभ्य एव प्रभवन्ति कीर्तयः
प्रभावमाहात्म्यमिति श्रितं गुणान् ॥ १५ ॥

अमर्षदर्पोद्धतकर्कशान्यपि
प्ररूढवैरस्थिरमत्सराण्यपि ।
प्रसादयन्त्येव मनांसि विद्विषां
शशिप्रकाशाधिककान्तयो गुण॰॰॰

म्हटल्यास ते कुमारसम्भव नव्हे, 'कुमारचरित' किंवा 'शिववश' काव्य होईल. मूळ मुद्याचा विचार करताना आपल्या लक्षात येते की, सर्वच प्राचीन टीकाकाराना हे वर्णन गर्ह्य वाटलेले नाही. आनन्दवर्धनासारखा मातबर काव्यशास्त्रज्ञ म्हणतो,

> महाकवीना अपि उत्तमदेवताविषयप्रसिद्धसभोगशृङ्गारादि अनौचित्य शक्तितिरस्कृतत्वाद् ग्राम्यत्वेन न प्रतिभासते। यथा कुमारसम्भवे देवीसम्भोगवर्णनम् ।
>
> (ध्वन्यालोक, उद्योत ३)

आनन्दवर्धनाचा अभिप्राय असा आहे की कवीच्या काव्यवर्णनात दोन तऱ्हेचे दोष असू शकतात. कवीचे, कवी म्हणून जे रचनासामर्थ्य असते ते कमी पडल्यामुळे होणारे दोष, आणि त्याची निर्माणशक्ती, प्रतिभा, हीच तोकडी पडल्यामुळे आलेले दोष. रचनेचे, भाषेचे, दोष प्रतिभेने झाकले जातात; प्रतिभेची उणीव मात्र कशानेच झाकता येण्यासारखी नाही. कालिदासाच्या वर उल्लेखिलेल्या वर्णनात ग्राम्यता भासत नाही, याचे कारण त्याची अलौकिक प्रतिभा. कालिदासाच्या अपूर्व काव्यशक्तीमुळे, सामान्य कवीच्या हाती ज्याला आगळपणा आला असता असे हे सभोगवर्णन वाङ्मयी कलेने उजळून निघाले आहे.

या बाबतीतले साहित्यिक तत्त्व आनन्दवर्धनानेच स्वत पुढे स्पष्ट केले आहे. हे तत्त्व म्हणजे औचित्य. औचित्यभगासारखा दुसरा दोष नाही. रतीचे वर्णन करावयाचे म्हटले तरी 'सुरत' हा एकच रतीचा प्रकार आहे असे थोडेच आहे? परस्पर प्रेमदर्शनाचे अनेक प्रकार कवीला कल्पिता येतील. त्यांच्यात सभ्यता आहे, आणि काव्यदृष्ट्या रसदर्शनाचा आनद देण्याचे सामर्थ्यही आहे. हे औचित्य कवींनी पाळावयास हरकत नाही. अशा विषयात महाकवीदेखील काही

चेष्टेत वाहावत जातात, आणि तसे ते गेल्यास तो दोषच म्हटला पाहिजे, असे आनन्दवर्धनाचे सांगणे आहे :

> न च सम्भोगशृङ्गारस्य सुरतलक्षणः एव एकः प्रकारः, यावद् अन्ये अपि प्रभेदाः परस्परप्रेमदर्शनादयः सम्भवन्ति, ते कस्माद् उत्तमप्रकृतिविषये न वर्ण्यन्ते ? यत्तु एवंविधे विषये महाकवीनाम् अपि असमीक्ष्यकारिता लक्ष्ये दृश्यते स दोष एव ।
>
> ( ध्वन्यालोक, उद्योत ३ )

आनन्दवर्धनाचे प्रकृति-औचित्य आणि विषय-औचित्य हे तत्त्व कोणालाही मान्य होण्यासारखे आहे. त्याचबरोबर अलौकिक प्रतिभा-शक्तीची आवश्यकता त्याने जी गृहीत धरली आहे तीही कलेच्या भूमिकेवर स्वीकारली पाहिजे. याचा अर्थ असा की, वर्ण्य विषय, नायकाची प्रकृती म्हणजे योग्यता, आणि विषयाला अपेक्षित कलात्मक बंध शृंगारानुकूल नसेल तर ते वर्णन उत्तान आणि कलादृष्ट्या रस-हानिकारक ठरावे. या कलात्मक भूमिकेवर मेघदूतातील काही वर्णनच्छटा आणि कुमारसंभवातील वर उल्लेखिलेले वर्णन दोषास्पद म्हणता येणार नाही. वैयक्तिक रुची-अरुचीप्रमाणे ते स्वीकारणे किंवा अव्हेरणे आपल्या हाती आहे; पण तात्त्विक कलात्मक भूमिकेवर त्याचा अनादर करण्याचे कारण नाही, असे मला वाटते. हे जरा स्पष्ट करण्यासाठी, कालिदासाच्या रघुवंशातली दोन स्थळे निर्देशित करतो : रघूच्या दिग्विजयाच्या वर्णनात तो मलय आणि दर्दुर या दक्षिणेकडील पर्वतावर काही काळ उपभोग घेत राहिला आणि मग तो सह्य पर्वत ओलांडून पश्चिमेकडे वळला, असे कालिदासाला सांगावयाचे आहे. पण हे वर्णन दुहेरी अर्थाने आणि उत्प्रेक्षेने करताना मलयदर्दुर हे दक्षिणदिशेचे स्तन आणि सह्य हा मेदिनीचा

नितंब झाला आहे (रघुवंश, ४.५१-५२) : यातील सूचित अर्थ आणखी सांगावयास नको. दिग्विजयाच्या वीररसात्मक प्रसंगात या संभोगशृंगाराच्या छटा अनपेक्षित आहेत, कलादृष्ट्या खटकणाऱ्या आहेत. तीच गोष्ट ताटकावधाच्या वर्णनात (रघुवंश, ११.२०) झाली आहे. रामाचा बाण हृदयावर लागून ताटका यमसदनास गेली; हे वर्णन रूपकाने आणि श्लेषाने, प्रणयविह्वल अभिसारिकेने प्रियकराच्या भेटीला जाण्याच्या ध्वनीशी मिसळून गेले आहे. इथेही हे अनौचित्य जाणवल्यावाचून राहात नाही. या विवेचनाचा मतलब असा की कलात्मक भूमिकेवरून आम्ही प्रणयप्रधान चित्रणाला जेव्हा आक्षेप घेऊ तेव्हा, समीक्षेच्या तत्त्वाप्रमाणे तो बरोबर ठरत असेल तर, त्याचे तथ्य कोणीही अमान्य करणार नाही. अर्थात अशी स्थले कालिदासाच्या साहित्यात कुठेकुठेच आढळतील हा जसा एक मुद्दा तसाच आणि महत्त्वाचा मुद्दा असा की, हा आक्षेप कलाहानीवरील आहे, प्रणयचित्रणावरचा नाही.

## [२]

जागत्या रसिकांचा आणि टीकाकारांचा आणखी एक वर्ग आहे. या वर्गाने कालिदासाच्या प्रणयचित्राला उघड उघड नावे ठेविली नाहीत, पण या प्रणयदर्शनाचे उन्नयन, उदात्तीकरण (sublimation) केले आहे. कालिदासाच्या प्रणयदर्शनात पृथ्वीचे स्वर्गात रूपान्तर होते, पार्थिव, शारीरिक प्रेमाचे आध्यात्मिक, विदेही प्रेमात उदात्तीकरण होते : असे या टीकेचे, तत्त्वचर्चेचे एकंदरीत सार आहे. आणि पार्थिव प्रेमाला स्वर्गीय पातळीवर नेणारा कालिदास येवढा श्रेष्ठ कलावंत आहे असा ध्वनीही या विवेचनात अनुस्यूत आहे.

समीक्षेच्या या भूमिकेत नाही म्हटले तरी दोन सूर आहेत. पार्थिव किंवा शारीरिक प्रेमाचे उन्नयन व्हावे, कालिदासाला ते करावे लागले आहे, या भूमिकेत पार्थिव आणि शारीरिक प्रेम ही एक निकृष्ट दर्जाची गोष्ट आहे आणि त्यातून माणसाने स्वतःला वर खेचून नेले पाहिजे, हे तत्त्व येथे उघड वा प्रच्छन्न रीतीने गृहीत धरलेले आहे. ही भूमिका संन्यस्त वृत्तीच्या निवृत्तिवादाची आहे हे जाणत्यांना सांगायलाच नको. याचबरोबर कालिदासाच्या प्रणयदर्शना-मध्ये स्त्रीपुरुषसंबंधाचे, प्रेमाचे उत्कट चित्रण आहे याचीही जाणीव ठेवावीच लागते. कालिदास एवढेच चित्रण करून थांबला असता तर, या टीकाकाराच्या दृष्टीने, तो सामान्य माणसासारखा सामान्य लेखक ठरला असता. सामान्य माणसाला विषयांच्या उपभोगात गोडी आहे. साहित्याने अशीच वर्णने मिटक्या मारीत केली तर उपभोगवृत्तीला केवळ पोसण्याचे कार्य साहित्याकडून होईल, माणसाला उन्नत स्तरावर नेण्याचे होणार नाही. म्हणजे साहित्याने असा उन्नतीचा उपदेश करावा, कलात्मक पद्धतीने किंवा उघडही, अशी भूमिका या समीक्षेत आणखी गृहीत आहे. कालिदासाने रतीचे वर्णन दिलखुलासपणे केलेले असले तरी त्यातून तो उदात्त भूमिकेवर येतो, आणि अतएव तो श्रेष्ठ आहे : या म्हणण्यात कालिदासाचा नकळत बचाव आहे, हेही आता आपल्या लक्षात येईल.

ही समीक्षा अतिशय सुखद आहे, श्रवणसुभग आहे. कारण, या समीक्षेने प्रणयाचे उत्कट दर्शन घडविणारा, प्रसंगी उत्तान होऊन वाहवत जाणारा कालिदास सामान्य लेखक होण्यापासून बचावला. आपल्याला मनापासून आवडणाऱ्या या कवीचेही उदात्तीकरण झाले. त्याचा आनंद आपल्याला झाल्यावाचून कसा राहील! पण आपला स्वत.चाही लाभ काही कमी नाही. उदात्तीकरण वगैरे गोष्टी आपल्याला नीट कळल्या नाहीत, आणि आपले मन दुष्यन्ताप्रमाणे मालिनीच्या

तीरावरील वेदगृहातच रेंगाळत राहिले, शकुन्तलेच्या मुखकमला-भोवती रुंजी घालणाऱ्या भ्रमराचा हेवा करणारा दुष्यन्तच आपल्या मनात सुरस भाव निर्माण करीत राहिला, तरी कालिदासाच्या काव्य-नाटकांचा आस्वाद आपल्या रुचीप्रमाणे घ्यायला आपण मोकळे राहिलो : यात कुठे तरी सदाचार आहे याची ग्वाही फार मोठ्या लोकांनी देऊन ठेविलेली आहे. म्हणजे या समीक्षेने आपण याचकही बचावलो.

प्रश्न एवढाच की कालिदासाला यातील काय अभिप्रेत आहे? या समीक्षेची छाननी आवश्यक आहे ती कालिदास समजण्यासाठी तर आहेच; पण कलानिष्ठ दृष्टिकोण समजण्यासाठीही आहे.

या समीक्षेप्रमाणे मेघदूतातील यक्ष, कालिदासाच्या पहिल्या नाटकातील अग्निमित्र आणि दुसऱ्यातील पुरूरवा हे भोगप्रिय, कामुक ठरतात. या समीक्षेचा आदर्श म्हणजे कुमारसंभवातील उमा. उमेने खडतर तप केले, नाजूक स्त्री देहाची पर्वा न करता निरशन, वायु-भक्षण, पंचाग्निसाधन अशी योग्यांनाही आचरण्यास कठीण तपश्चर्या केली. आध्यात्मिक दृष्टीने जी उच्च मूल्ये समजली जातात ती उमेने आपल्या जीवनात साकार केली. म्हणूनच तिला शिवाची प्राप्ती झाली, शिवदेहात ती मिळून गेली. दुष्यन्त आणि शकुन्तला यांचे प्रेम वेगळ्या रीतीने तावून सुलाखून निघाले. प्रथम ते दोघे एकमेकांकडे आकृष्ट झाले ते शारीरिक ओढीने. शकुन्तला कण्वाच्या आश्रमात, त्यांच्या उपदेशाखाली वाढलेली. म्हणून तिला या प्रेमाच्या आकर्ष-णाची, 'तपोवनविरोधी विकारा'ची जाणीव झाली. परन्तु जाणीव होऊनही ती स्वतःला सावरू शकली नाही. असहायपणे वहावतच गेली. ही तिची पहिली चूक. याच प्रमादशीलतेमुळे कण्वांनी तिच्यावर सोपविलेले अतिथिसत्काराचे कार्य ती विसरली, दुर्वास ऋषींचा अवमान करून बसली. या प्रमादाचे प्रायश्चित्त तिला अव्हेराच्या रूपाने

भोगावे लागले. सहा वर्षे एकाकी विरही जन मारीचाश्रमात तिने पाळले तेव्हा तिच्या पार्थिव प्रेमाची शुद्धी झाली आणि ती पुनर्मीलनास योग्य झाली. दुष्यन्त तर बोलून चालून पार्थिव! मुखातील जरी त्याने ' अपि तपो वर्धते ' असा तपविषयक योग्य प्रश्न शकुन्तलेस विचारला तरी एकंदरीत त्याची वृत्ती तपोवनाचे उपवन करण्याची. तो भोगासक्त होता, आणि हंसपदिकेने म्हटल्याप्रमाणे भ्रमराप्रमाणे मधुलोलुप होता. शकुन्तलेप्रमाणे त्यानेही विरहाग्नीने भाजून निघणे आवश्यक होते. पुत्र हा पितरांना नरकातून तारणारा, हा विवाहाचा पारमार्थिक अर्थ त्याला जेव्हा कळला, आणि स्वर्गात असुराविरुद्ध युद्ध जिंकून निःस्वार्थ, परहितकारी असे देवकार्य करण्याची त्याला जेव्हा संधी मिळाली, तेव्हा दुष्यन्ताच्या भावनांचे उन्नयन झाले, आणि शकुन्तलेला भेटण्यास तो योग्य झाला. मग हे मीलन पृथ्वीपासून वर उभारून असलेल्या हेमकूट पर्वतावर, जिथे देवगुरु आणि देवमाता राहातात, अशा स्वर्गाहून रम्य स्थळी घडून आले. अशा रीतीने पृथ्वीचे स्वर्गात रूपान्तर झाले, पार्थिवाचे दिव्य झाले, शारीरिक प्रेमाचे आध्यात्मिक प्रेमात उन्नयन झाले.

ही समीक्षा, शाकुन्तल व कुमारसंभव यांचा हा अर्थ, ऐकायला मोठा गोड आहे. पण ' श्रवणसुभग ' असा जो शब्द मी वापरला तो याचसाठी पण ही समीक्षा कालिदासाच्या प्रणयदर्शनाला नितान्त गैरलागू आहे हे स्पष्टपणे सांगण्याची वेळ आली आहे. इतकेच नव्हे तर कलादृष्ट्या ही मीमांसा इतकी असमंजस आहे की तिचे अप्रयोजकत्व स्पष्ट केले नाही तर कलामीमांसेमध्ये आणखी अनर्थ झाल्यावाचून राहाणार नाहीत. ही मीमांसा एका परंपरेमधून आलेली आहे. तिने प्राध्यापक आणि टीकाकार यांचा फार मोठा वर्ग भारावलेला आहे. अजूनही याच मीमांसेची वारंवार री ओढली जाते. काही विवेचकांना, भरताचा रहस्यप्रधान आणि अध्यात्म-

प्रथम गौरव गायला ही मीमांसापद्धती ज्यांनी कामी आणली आहे, तद्वत काही टीकाकारांच्या हाती तिचे एक शस्त्र वा साधन बनले आहे. शारीरिक प्रेम आणि आध्यात्मिक प्रेम ही त्यांच्या हाती वॉशिंग्टनची कुऱ्हाड झाली आहे. कुठल्याही झाडावर ती चालवून पाहावी. संस्कृत नाटकात मीलन आणि पुनर्मीलन दिसावयाचा अवकाश; पहिल्याला शारीरिक आणि दुसऱ्याला आध्यात्मिक अशा चिठ्या लावून हे टीकाकार-विवेचक मोकळे झालेच. यात मोकळेपणाही नाही; कारण, आपण केवढा उदात्त अर्थ साहित्याला बहाल केला, अशी आत्मसंतुष्टता पण या विवेचनात दडलेली असते. काव्यसमीक्षेच्या आरोग्यासाठी या मीमांसेचा परामर्श घेतलाच पाहिजे.

योग्यांनाही लाजवील अशी उग्र तपश्चर्या उमेने केली. कशासाठी ? शिवाची प्राप्ती करून घेण्यासाठी. लौकिक भाषेत, आपले मन ज्यावर बसले तो नवरा मिळावा म्हणून, असा त्याचा स्पष्टार्थ आहे. नवरा मिळविण्यासाठी उग्र तप ही जर अध्यात्मसाधना, तर बायको मिळविण्यासाठी केलेले सायास आणि भोगलेल्या मानसिक यातना यांना काय नाव द्यावयाचे ? शिव हा तर मोठा योगी. उमेच्या तपस्येने प्रसन्न झाल्यावर त्याने तिला साक्षात दर्शन देऊन मोक्षाला का नेले नाही ? येऊन तिचा हात कशाला धरला ? आणि कालिदासाने तरी त्यांचा लग्नाचा सोहळा अगदी गर्भाधानापर्यंत कशाला 'रंगवून सांगितला ? पार्वतीची तपश्चर्या फळाला येताच, शिव आणि पार्वती दोघेही हिमालयाच्या वा कैलासाच्या दोन शिखरांवर बसून योग-समाधीत बुडून गेल्याचे दाखविण्याच्याऐवजी शय्यागृहाचे अंतरंग कालिदासाने कशाला उघडून दाखविले ? मानवी दंपतीला अपत्यसंभव होणे ही एक मामुली घटना, देवाची गोष्ट वेगळी; कारण त्यात 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्' असे एक दैवी प्रयोजन

गुंतले आहे; असे मानले तरी, कालिदासासारख्या कवीने हा असभ्य-समर प्रत्यक्ष वर्णन कशाला करावा ? -नुसता सूचित करून सोडून का देऊ नये ? या प्रश्नांची उत्तरे वरील समीक्षेत मिळणार नाहीत. पण याचा अर्थच हा की ही मीमांसा कालिदासाच्या प्रणयदर्शनाला लावता येणे शक्य नाही.

अनाग्रही भूमिकेवरून दुष्यन्त-शकुन्तला यांच्या प्रणयाचे चित्र निरखिले म्हणजे वरील मीमांसेचा अप्रयोजकपणा अगदीच स्पष्ट झाल्यावाचून राहात नाही. आश्रमात आल्यावर प्रथम भेटीच्या प्रसंगी 'अपि तपो वर्धते' असा प्रश्न दुष्यन्त शकुन्तलेला विचारतो. तपोवनाच्या वातावरणात हा प्रश्न विचारणे अगदी स्वाभाविक आहे. शकुन्तला कोणतेही तप करीत नव्हती. पुढे दुष्यन्त जेव्हा, 'हिने वैखानसव्रत पाळावयाचे असे ठरले आहे का ?' असा प्रश्न विचारतो तेव्हा, शकुन्तलेची सखी त्याला नकारार्थी उत्तर देते हे आपल्याला माहीत आहे. 'तपोवनविरोधी विकार' आपल्या हृदयात उत्पन्न झाल्याबद्दल शकुन्तलेला भीती वाटते त्याचा अर्थही नीट लावायला हवा : एक तर, प्रबळ आवेग मनात येत असताही शकुन्तला आत्म-शोधन करू शकते, आपले काही चुकले तर नाही ना, अशा जाणिवेने कावरीबावरी होते, यात तिच्या सदसद्विवेकबुद्धीचा जसा प्रत्यय आहे, तसा आश्रमातील शिस्तीचे जे संस्कार तिने ग्रहण केले आहेत त्याचेही प्रत्यंतर आहे. दुष्यन्ताच्या आगमनाने आश्रमाची शान्ती वेगळ्या अर्थाने ढळून निराळी. दुष्यन्ताचा रथ पाहून बुजलेला तपोवनातला हत्ती, या धरारक प्रसंगाचे बाह्य रूप आणि शकुन्तलेच्या मनाची चलबिचल हे त्याचे मानसिक रूप. कलात्मक वातावरणाचे रंग भरीत सूचक आकृती निर्माण करण्यात कालिदास फार कुशल आहे. पण त्याच्या सूचनेचा अर्थ आपण आपल्याला हवा तसा लावावा, हे कसे चालेल ? व्यंजनेचा शास्त्रप्रणीत नियमच मुळी असा आहे की

व्यंग्यार्थ हा वाच्यार्थाश्रित आहे; वाच्यार्थावरून त्यातील वैशिष्ट्याच्या अनुरोधाने तो प्रकाशित व्हावा. कालिदासाला जर दुष्यन्त-शकुन्तला यांचे प्रेम तपोवनविरोधी वाटत असते तर पुढील त्याच्या चित्रणाला काही कलात्मक अर्थच उरणार नाही. योग्य वर पाहून शकुन्तलेचा विवाह करण्याचाच तातकाश्यपांचा विचार आहे, असे आश्वासन शकुन्तलेच्या सखीने द्यायचे कारण नाही, आणि कण्वानीही या प्रीतिविवाहाबद्दल शकुन्तलेचे अभिनन्दन करून तिला पोट भरून आशीर्वाद द्यायचे प्रयोजन नाही. तपोवनविरोधाचा किंवा तपोवनाचे उल्लंघन केल्याच्या वृत्तेचा अर्थ मग एवढाच आहे की, दुष्यन्त आणि शकुन्तला यांची अकल्पित भेट ही तपोवनात घडणारी नेहमीची घटना नाही. आणि ते खरेच आहे. तपस्साधना करणारे तापस आणि विद्याभ्यास करणारी तरुण मुले यांच्या शिस्तबद्ध, शान्त जीवनात हे प्रेमप्रकरण म्हणजे नेहमीपेक्षा वेगळी, खळबळ उडवून देणारी, एक घटना आहे यात शंकाच नाही. आजही एखाद्या योगाश्रमात किंवा विद्यालय-महाविद्यालयात एखादे प्रेमप्रकरण उत्पन्न झाले तर खळबळ उडेलच; त्याला आपण 'विरोधी' म्हणू ते याच अर्थाने की शाळाकॉलेजे म्हणजे प्रेम करण्याच्या आणि लग्न जमविण्याच्या जागा नव्हत ! तरी असे घडतेच, आणि विद्यालयीन शिस्तीच्या दृष्टीने आपण थोडे बावरूनही जाऊ. कालिदासाच्या कलात्मक व्यंजनेचा अर्थ आणखी किती ताणीत न्यायचा ? अभ्यास करीत असता (किंवा अभ्यास न करता) प्रेमात पडणाऱ्या मुलामुलींना आपण विद्यापीठातून हाकलून देत नाही की त्यांना शाप देत नाही. अवेळी हे घडत असल्यास किंवा निवड चुकत असल्यास त्यात त्यांच्याच भावी जीवनाला धोका आहे, एवढेच आपल्याला सांगावयाचे असते. कण्वानीही 'धूमाकुलितदृष्टे यजमाना'चे रूपक वापरून हा धोका टाळविला आहे. सुदैवाने, दुष्यन्त 'अर्हतां प्राग्रसर' होता, त्याच्याइतका अनुरूप आणि प्रभावसंपन्न पती शकुन्तलेला दुसरा

मिळण्याची शक्यताच नव्हती. कालिदासाच्या कलात्मक चित्रणाचा एवढाच अर्थ आहे. ह्या चित्रणात प्रीतीचा निषेध नाही, की विवाहाचा इन्कार नाही. तत्कालीन गुरुकुलत आणि ऋषिमुनींच्या आश्रमात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना एक विद्यार्थीजीवन शिस्त, आजच्या-प्रमाणेच, पाळावी लागत असे. त्यांना गुरुगृही कामे नेमून दिलेली असत. चंद्रसूर्याची घड्याळे पाहून गुरूंना स्नानाची, यागादिकांची वेळ सांगणे, वनातून समिधा, फुले, फळे घेऊन येणे; पूजेची व संध्यावंदनाची तयारी करून ठेवणे मुलींना आश्रमातील झाडांना पाणी घालण्याची, पाणवठ्यावरून पाणी आणण्याची, स्वयंपाकात मदत करण्याची, अशी कामे असत. ही शिस्त पाळून अध्ययन चाले. अध्ययन पूर्ण झाल्यावर एखाद्या विद्यार्थ्यास तापसजन व्हावेसे वाटले तर त्याला प्रत्यवाय नव्हता. परंतु बहुतेक स्नातक गुरूचा आशीर्वाद घेऊन गृहस्थाश्रमात प्रवेश करीत याबद्दलही संदेह बाळगण्याचे कारण नसावे. तपोवन आणि आश्रम यांच्या सारख्या निग्रही वातावरणात विद्याभ्यास आणि शिस्तपालन ही प्रमुख कर्तव्ये असत. या अर्थाने तपोवन उत्सव नाहीच. पण याचा अर्थ असाही नाही की, प्रीतिभावनेला दडपून टाकण्याचे शिक्षण इथे दिले जात असे. तसे असते तर गुरुकुले आणि आश्रम जोगिणी आणि संन्यासी बनविण्याच्या शाळा झाल्या असत्या! वस्तुस्थिती अशी आहे की, निसर्ग आणि निसर्गातले पशुपक्षी यांच्यावर प्रेम करण्याची, बंधुभावाने, स्नेहाने वागण्याची दीक्षा जी या वातावरणात अनायासे मिळत असे ती व्यक्तीच्या भावी जीवनाचा पाया ठरण्यासारखी होती. शकुन्तलेच्या जीवनात हे दिसून येतेच. गृहस्थजीवनाकडे नेणारी ही प्रीती कालिदासाने कधीही अव्हेरलेली नाही. शाकुन्तलातील एकही पात्र, शकुन्तलेने प्रेमात पडून काही भयंकर प्रमाद केला आहे आणि त्याबद्दल तिला तशीच भयंकर

शिक्षा मिळायला पाहिजे किंवा मिळाली, असे म्हणवत नाही. कालिदासाच्या चित्रणाचा पुरावा वरील मीमांसेच्या सर्वस्वी विरुद्ध आहे. म्हणूनच ही मीमांसा लादलेली आहे, कालिदासाला अभिप्रेत नसलेली आहे; अतएव अप्रयोजक आहे.

शाकुन्तलातील शापाचा अर्थही वरील मीमांसेत असाच विपरीत, भ्रममूलक झाला आहे. दुर्वासाच्या आगमनाची चाहूल शकुन्तलेला लागली नाही; आणि म्हणून ती त्याचा सत्कार करायला पुढे गेली नाही. तिला चाहूल लागली नाही त्याचे कारण, नुकताच विवाह झाल्यानंतर पतीची आणि तिची प्रथमच ताटातूट झालेली आहे. शरीराने ती आश्रमात असली तरी तिचे हृदय ठिकाणावर नाही (अद्य पुनः हृदयेन असन्निहिता।). या स्थितीत अकल्पित येणाऱ्या अतिथीकडे तिचे दुर्लक्ष झाले, हा अपराध! आणि दुर्वासाकडे लक्ष न देता शकुन्तला विचार करीत होती तो तरी कोणाचा? आपल्या पतीचाच ना? 'भर्तृगतया चिन्तया आत्मानम् अपि न एषा विभावयति। किं पुनः आगन्तुकम्।' हे शकुन्तलेच्या सखीला जाणवले, वरील मीमांसकांना मात्र नाही. नवोढेने, पहिल्याच विरहाच्या प्रसंगी घटकेला भान हरपून विमनस्क व्हावे आणि आपल्या पतीचे चिंतन करावे, हा शापार्ह गुन्हा केव्हापासून झाला? कालिदासाचे या प्रसंगाचे चित्रण सूचक असूनही इतके बोलके आहे की त्याचे व्यंग्यार्थ या रसिक म्हणविणाऱ्या मीमांसकांना कसे दिसले नाहीत, याचे मला राहून राहून आश्चर्य वाटते. येणाऱ्या अतिथीचे, दुर्वासाचे वर्णनही कालिदासाने फार सूक्ष्मतेने केले आहे. दुर्वास आगन्तुक आहे, आपण होऊन आलेला आहे; तो 'सुलभकोप' आहे, 'प्रकृतिवक्र' आहे; कोणाचाही अनुनय मानून घेणारा नाही; शकुन्तलेसारख्या निरागस मुलीच्या हातून आयुष्यात हा

प्रथमच अपराध झाला; नकळतही घडलेल्या चुकीला जबरदस्त शिक्षा देण्याचा प्रमाद तर.सामर्थ्यात आहे याची जाणीव या भाबड्या मुलीला नाही, म्हणून झाला, इतके असूनही एखाद्याने राग तरी किती करावा? स्वतःच्या आत्याच्या, अपत्यसदृश मुलीला, मानून घ्यावी इतका! हे दुर्वासच करू जाणे! जाळणे हा अग्नीचा धर्म, तसा वाटेल तो शाप उच्चारणे आणि हट्टाने तो मागे न घेणे हा दुर्वासाचाही प्रकृतिधर्म! परन्तु, नवमालिकेसारख्या कोमल शकुन्तलेवर शापाचे उकळते पाणी कोण ओतील? या हृदयात कालिदासाने जी हेतुगर्भ साभिप्राय विशेषणे आणि वाक्ये योजिली आहेत (ज्याचा अनुवाद वर आहे), ती त्यांतील व्यंग्यार्थांसह पाहिली म्हणजे दुर्दैवाने एका खाष्ट ऋषीच्या कोपाचा शकुन्तला नाहक बळी ठरली असेच, तिच्या सखीप्रमाणे, कोणाही रसिकाला वाटावे. कालिदासाची शब्दकळा हा आशय व्यक्त करते. आणि हे जर खरे तर मग, शाप म्हणजे पार्थिव प्रेमाला शिक्षा, या सीमासेला आधार तरी काय, अर्थ तरी काय! कालिदासाचा पूर्वजन्मावर विश्वास आहे. शकुन्तलेच्या दैवातच काही प्रतिकूल होते. त्याचा उच्चार कालिदासाने कथेच्या आरंभीच केला आहे. आणि प्रतिकूल दैव दुर्वासाच्या रूपाने साकार होते ही कालिदासाची कल्पक मांडणी आहे. हा दुर्दैवाचा तडाखा मागील जन्मीच्या काही तरी प्रमादाचा भोग आहे, चालू जन्मातील नव्हे, हेही विसरू नये. प्रतिकूल दैवाचे तडाखे चुकवावे म्हणून कण्वानी अपत्यवत्सलतेने सोमतीर्थाची यात्रा केली. पण दैव बदलण्याचे सामर्थ्य कोणातही नाही. कण्वाच्या पुण्याईमुळे शकुन्तलेचे जीवनच बरबाद होण्याचे टळले आणि प्राप्त भोग भोगल्यावर तिची पतीशी पुन्हा गाठ पडली, एवढेच. शकुन्तलेच्या प्रतिकूल दैवाच्या फेऱ्यात दुष्यन्तही साहजिकच गोवला गेला. दोघांच्या यातनांचा अर्थ, कालिदासाच्या कल्पनेनुसार निष्पन्न होतो तो असा.

कलेच्या अधिष्ठानावरून, दुष्यन्त शकुन्तलेची कहाणी ही दैवाने, म्हणजे पूर्वसंचिताने, बिघडलेल्या जीवनाची कहाणी ठरते. शेक्सपिअरच्या शब्दात बोलावयाचे तर ही ' A pair of starcrossed lovers'ची कथा आहे : दैवदुर्विलासाने दुभंगलेल्या प्रणयाची कथा आहे.

[ ३ ]

दुष्यन्ताचा जो विचार करावयाचा तो कालिदासाचे एकंदर नायक लक्षात घेऊनच केला पाहिजे. दुष्यन्ताच्या चित्रणावर येणारे आक्षेप कमी-अधिक प्रमाणात इतर नायकावर येतातच, हे एक कारण. दुसरे असे की, कालिदासाच्या सृष्टीत उपेक्षित स्त्रिया अनेक असल्या तरी त्याच्या निर्मितीविषयी आपल्या मनात कुठेही शंका नाही. उमा जीवनाचा होम करायला निघाली होती, शकुन्तलेने परिधूसर वसन नेसून दीर्घ विरहव्रत आपल्या निष्ठुर पतीसाठी भोगले; सीतेने वनवास आणि परित्यक्तेचे एकाकी जीवन अबोलपणे स्वीकारले, रतीने आपल्या अमर्याद प्रीतीची साक्ष पतिनिधनानंतरही दिली. ह्या सर्व शुद्धशील आणि पतिनिष्ठ अशा स्त्रिया. धारिणी, इरावती, औशीनरा, हंसपदिका या राण्यांनी पतीच्या वर्तनाविषयीची आपली नाराजी आपापल्या परीने व्यक्त केली; पण कोणीही पतीच्या विरुद्ध गेल्या नाहीत. पृथ्वीचा उदारपणा आणि सोशिकपणा या स्त्रियांच्या मध्ये आहे. कालिदासाचे हे स्त्रीचित्रणही असे आहे की कोणाही वाचकाला त्यांच्याबद्दल आदर, आपुलकी, सहानुभूती वाटावी. शिवाय, स्त्री म्हणून एक अनुकंपेचा स्रोत पुरुषी वाचकाच्या मनात असतोच. कालिदासाच्या स्त्रीसृष्टीविषयी आमचा काही आक्षेप नाही. फार तर कालिदासाने या स्त्रियांची जी उपेक्षा केली त्याबद्दल थोडा राग,

निदान अप्रीती, आपल्या मनाला स्पर्शून गेल्याचा अनुभव आपल्याला आला असेल.

कालिदासाच्या नायकाबद्दल मात्र आपली विचारसरणी वेगळी आहे. शिव किंवा राम हे अपवाद वगळल्यास कालिदासाचे, मुख्यतः त्याच्या नाटकांचे, नायक बहुपत्नीक आहेत. स्वतःची एक किंवा अधिक भार्या असताना हे आणखी एका स्त्रीवर प्रेम करू लागतात. त्यांच्या ताडची भाषा ही आसक्तीची भाषा आहे, काही वेळेस आपल्याला असभ्य वाटावी अशीही. म्हणजे हे नायक रंगेल आहेत; लंपट आहेत. मग त्यांच्या प्रेमाविषयी शाश्वती कशी वाटावी? पुरुष हा शेवटी भ्रमरच, मतलबी!

कालिदासाचे प्रणयदर्शन नीट समजण्यासाठी वरील विचारसरणी बारकाईने तपासून पाहाण्याशिवाय गत्यंतरच नाही.

चंचल आणि भोगलोलुप, स्त्रीकडे भोग्य वस्तू म्हणून केवळ पाहाणारा, असे पुरुषी स्वभावाचे चित्र कालिदासाला अभिप्रेत आहे काय? निव्वळ वास्तववादाची दृष्टी स्वीकारूनही हा अभिप्राय आपल्याला स्वीकारता येणार नाही. आणि त्याची दोन कारणे आहेत : केवळ रामच नव्हे, तर दुष्यन्त, पुरूरवा, किंबहुना अग्निमित्रही, म्हणजे कालिदासाने रंगविलेले राजे, हे त्या वेळच्या समाजाच्या आदर्श पुरुषाचे प्रतीक आहेत, प्रतिनिधीरूप आहेत. आपल्याला हे आदर्श पसंत नसले तर आपण ते अव्हेरू शकतो. हे स्वातंत्र्य आपल्याला आहेच. पण त्याचबरोबर आपण हेही विसरता कामा नये की समाजाचे आदर्श कालपरत्वे बदलत असतात. आणि म्हणूनच एका काळातले आदर्श पुरुष आज आदर्श वाटले नाहीत तरी एका वेळचे ते आदर्श होते, हे सामाजिक आणि ऐतिहासिक सत्य खोटे पडत नाही. आपल्या मनाचा कल आज एकपत्नी राम आदर्श मानण्याकडे

असला तर तेवढ्याने बहुपत्नीक दुष्यन्त हा काही रंगेल लफंगा ठरत नाही. कालिदासाने दुष्यन्ताचे आणि इतर नायकाचे वर्णन आदर्श राजा म्हणूनच केले आहे. या सामाजिक सत्याकडे आपल्या वैयक्तिक आवडीनिवडीप्रमाणे दुर्लक्ष करणे खाजगी व्यवहारात ठीक असले तरी कलेच्या प्रान्तात हा एक मूर्खपणा होईल. दुसरी गोष्ट अशी की, साहित्याचे आणि कलेचे जे दंडक व संकेत संस्कृत साहित्यशास्त्रात रूढ होते त्यांना अनुसरून काव्याचा किंवा नाटकाचा नायक धीरोदात्त, धीरललित, धीरोद्धत आणि धीरप्रशान्त यांपैकी एखाद्या प्रकारात बसेल असाच निवडण्याचा आणि रंगविण्याचा परिपाठ होता. जीवनाच्या इतर क्षेत्राप्रमाणे, साहित्यातही कालिदासाने ( भासाने केली तशी ) बंडखोरी कुठे केलेली नाही. साहित्यशास्त्राच्या या निकषाप्रमाणेही कालिदासाचे नायक धीरोदात्त व धीरललित या प्रकारात मोडतात; म्हणजे आदर्श नायक ठरतात. तेव्हा, आधुनिक वास्तववादाची दृष्टी घेऊन, कालिदासाने सामान्य पुरुषाची चालत्या घराबरची चित्रे रंगविली आणि त्यातून पुरुषी स्वभावाचे दुर्गुण दाखविले हे म्हणणे किंवा सूचित करणे, सामाजिक आणि कलात्मक संकेत या उभय दृष्टीने निराळव खोटे पडते.

या विवेचनाचा अर्थ असा की कालिदासाच्या नायकांकडे पाहाण्याची, ते निदान जाणून घेण्याची, दृष्टी आम्ही निकोप करावयास हवी. कलेची समीक्षा करताना, चित्रणाचे जे विशेष रंग कलावंत भरीत असतो, त्याची समज स्थलकालाचा संदर्भ सोडल्यास कशी येऊ शकेल ? याविषयी मी तरी साशंक आहे. शेक्सपिअरने आपल्या नाटकांत भुते आणून त्यांना बोलावयाला लावले, किंवा चेटकिणींना उकळत्या कढईभोवती फेर धरायला लावून भविष्य वदवायला लावले, तर ते आम्हाला समजते. आम्हाला

समजूत नाही फक्त आमच्याच देशात आणि समाजात परवा-परवापर्यंत रूढ असलेली बहुपत्नीकत्वाची चाल. ही चाल वाईट होती याबद्दल कोणाचे दुमत आहे ? पण ज्या काळी कालिदासाने आपली काव्यनाटके लिहिली त्या काळी जर ही चाल सर्रास रूढ होती, तर तिचे चित्रण न करता, आज विसाव्या शतकात आम्हाला प्रिय असलेली चाल कालिदासाने रंगविली नाही म्हणून त्याच्या नायकांना नावे ठेवण्याची ही कलासमीक्षा कोणा मुलुखाची ? तत्कालीन राजे आणि सधन लोक बहुपत्नीक होते याचा पुरावा शाकुन्तल नाटकात धनमित्राच्या प्रकरणाने आपल्यापुढे स्पष्ट आलेला आहे. सामाजिक दृष्टीने बहुपत्नीत्वाचा प्रश्न आर्थिक परिस्थितीशी निगडित आहे हे विचारान्ती आपल्याला कळून येईल. आज एक पत्नी पोसताना नाकी दम येतो; मग दोन तीनची गोष्टच दूर राहिली ! प्राचीन काळच्या अर्थव्यवस्थेत हे शक्य होते, एवढाच याचा अर्थ आहे. सधन लोक अनेक विवाह करू शकत होते; आणि एखादा शेतकरीही शेतावर राबण्यासाठी पगारी मजूर आणण्यापेक्षा स्वतःची बायको राबविणे कमी खर्चाचे, या जाणिवेने परवापरवापर्यंत अनेक लग्ने करीत होता. ही झाली एक आर्थिक बाजू, तशी दुसरी प्रतिष्ठेची बाजू. पैसेवाईक अंगवस्त्र बाळगणे हे मोठेपणाचे लक्षण होते, याचा विसर पडू देऊ नये. मुद्दा एवढाच की बहुपत्नीत्वाचे शस्त्र करून कालिदासाच्या नायकांवर प्रहार करण्याचे कारण नाही. ज्या रामाचा आपण एवढा आदर करतो त्याला तीन माता होत्या, म्हणजे त्याच्या पित्याने तीन बायका केल्या होत्या, हा इतिहास आहे. कालिदासाच्या नायकाचे बहुपत्नीत्व हा तत्कालीन समाजरचनेचा एक अटळ भाग होता आणि तेवढ्याच भूमिकेतून कालिदासाने बहुपत्नीक नायकाचे चित्रण केले. तसे त्याने केले नसते तर त्याची नाटके तत्कालीनांना अवास्तव वाटली असती. इथे आपल्या-

नाकारण्याचा प्रश्न नाही. तो कलाबाह्य आहे.

तत्कालीन संदर्भांचे जे तत्त्व वरील विवेचनात आहे त्या तत्त्वाने संस्कृत काव्यनाटकांमधील स्त्रीच्या वर्णनावरही चांगला प्रकाश पडावा. संस्कृत साहित्यातील अनेक विशेषणे आणि संबोधने अशी आहेत की त्यांचा उच्चार आज आम्ही एखाद्या स्त्रीला उद्देशून केला तर विनासायास आपल्यावर विनयभंगाची फिर्याद होईल आणि कोठडीची हवा आपल्याला खावी लागेल! मग संस्कृत साहित्याच्या आणि कालिदासाच्या काळी अशी विशेषणे आणि संबोधने कशी वापरली गेली? काव्यापेक्षाही नाटकातला त्यांचा वापर विचार करावयास लावणारा आहे. संस्कृत नाटके प्रयोग करण्यासाठीच लिहिली गेलीत यात शंकाच नाही. राजाची फर्माईश म्हणून, किंवा उत्सव, यात्रा, धार्मिक सण इत्यादी निमित्ताने संस्कृत नाटके प्रयुक्त होत. हे नाट्यप्रयोग पाहाणाऱ्या तत्कालीन आबालवृद्ध, स्त्रीपुरुष समाजाने आपल्याला चावट वाटणारे हे शब्दप्रयोग कसे ऐकून घेतले? शकुन्तलेच्या स्तनजघनांचे वर्णन करणाऱ्या दुष्यन्ताला त्या प्रेक्षकांनी रंगमंचावर जाऊन बदडून का काढले नाही? निदान अंडी किंवा टमाटे तरी फेकावेत? या विवेचनाचे तत्त्व सुज्ञांना समजावे. काळाच्या ओघात जे समाजपरिवर्तन घडून येत असते त्यात संस्कृतीच्या आणि सभ्यतेच्या गुणां बदलत असतात हे वास्तविक तथ्य आहे. कालिदासाचे नायक रंगेल किंवा चावट नाहीत; आम्ही आहोत! कारण, एके काळी जे शब्दप्रयोग लोकांना खटकत नव्हते (असेच मान्य केले पाहिजे), ज्यात असभ्यपणा नसून सौंदर्यदृष्टीचा रसिकतेचा मान होता, त्या उक्ती आम्हाला चावट वाटतात; आणि या दृष्टीचा आरोप, तत्कालीन सामाजिक संकेताकडे चक्क डोळेझाक करून आम्ही तत्कालीन नायकांवर करीत आहोत.

संस्कृत काव्यनाटकातील काही विशेषण संबोधनाकडे आणखी एका वेगळ्या दृष्टीने पाहाता येते. विक्रमोर्वशीय नाटकाच्या तिसऱ्या अंकात, उर्वशीने हळूच पाठीमागून येऊन आपले डोळे झाकावेत अशी इच्छा पुरूरवा प्रकट करतो (अंक ३, श्लोक १८). अदृश्य असलेली उर्वशी पुढे येऊन त्याप्रमाणे राजाची इच्छा तृप्त करते. राजा स्पर्शावरून उर्वशीला ओळखतो. तो विदूषकाला म्हणतो, 'मित्रा, नारायण ऋषीच्या ऊरूपासून उत्पन्न झालेली हीच ती वरोरू!' राजाच्या या विशेषणाचा यथार्थ घ्यावयाचा म्हटल्यास आधुनिक वाचकाला प्रश्न पडेल की, उर्वशीच्या हाताचा आपल्या डोळ्याना स्पर्श झाला एवढ्यावरून तिच्या मांड्या सुन्दर आहेत हे पुरूरव्याला कसे कळून आले ? याचा अर्थच असा असा की, स्त्रीच्या शरीरावयवाचे वर्णन करणारे अनेक शब्द, त्यांचा अवयववाचक अर्थ लुप्त होऊन, 'सुंदर' या सामान्य अर्थाने संस्कृत भाषेत रूढ झालेले होते. वरील उदाहरणातील 'वरोरू'चा अर्थ 'सुंदरी' एवढाच घ्यायला हवा. संस्कृत साहित्याचा अभ्यास करताना, भाषेविषयीची ही दृष्टी समजून घेणे अत्यंत महत्त्वाचे आहे. रसास्वादासाठी ही दृष्टी अनिवार्य आहे.

संस्कृत काव्यनाटकामध्ये स्त्रीचे वर्णन, तिच्या अंगप्रत्यंगाचे वर्णन जे येते त्याचा अर्थही या संदर्भात स्पष्ट व्हावा. एक कारण हे की असे वर्णन हा साहित्यातला एक संकेत आहे. दुसरे, अशा वर्णनात सौंदर्यग्रहणाचा एक प्रयत्न आहे. तिसरे, स्त्री ही लावण्याचे निधान आहे, सौंदर्याची प्रतिमा आहे अशी भावना कविमनात असते. ही भावना सर्वच काळयात सर्व कवींनी दिसून येते. टागोरांनी, 'Thou art a handiwork of God' असे स्त्रीविषयी म्हटले; त्याच्या दोन सहस्र वर्षे आधी कालिदासाने, चट, मदन किंवा पुष्पकर माम यांनी उर्वशीला घडविले असावे असे सांगितले, आणि शकुन्तलेचे

अनुपम लावण्य पाहून तिला नेहमीप्रमाणे घडविण्याचा धीर ब्रह्याला झाला नसावा, तर अगोदर अत्यंत निर्दोष, परिपूर्ण असे चित्र आपल्या सर्व सामर्थ्यानिशी रेखाटून मग त्या चित्राला त्याने जिवंत केले असावे, असा विचार त्याच्या मनात येऊन गेला. असे हे स्त्रीच्या लावण्याचे वर्णन साहित्याचे एक लेणे आहे. आणि सौंदर्यवती स्त्री-विषयी प्रेम वाटावे ही मानवी स्वभावाची एक ऊर्मी आहे. ज्याना या सौंदर्यात्मक भूमिकेवरून कविवर्णनाचा आस्वाद घेता येत नाही त्याच्यासारखे दुर्दैवी तेच!

[ ४ ]

आपले नायक रंगविताना वर वर्णन केलेल्या सामाजिक निष्ठा आणि साहित्याचे संकेत कालिदासाच्या समोर होते, आणि हे ध्यानीं घेऊनच त्याला आपली कला सजवावी लागली. पुरुषप्रधान, बहुपत्नीक समाजव्यवस्थेत पुरुषाच्या प्रेमावर चंचलपणाचा, मतलबी किंवा बेजबाबदार अभिलाषेचा आरोप होणे फार सुलभ आहे. त्याचबरोबर पुरुषी प्रेम जर असे बेभरवशाचे असेल तर एकीकडे स्त्रीला दारुण अन्याय होईल आणि दुसरीकडे कलात्मक चित्रणातील सारे स्वारस्यच नष्ट होईल. या गोष्टींची आणि त्यातून निर्माण होणाऱ्या कलात्मक अडचणींची कालिदासाला पूर्ण जाणीव होती. प्रणय-दर्शनात आरंभीच डोकावणाऱ्या या शृंगारदोषाला तोंड देण्यासाठी कालिदासाने काही कलात्मक उपाय योजले आहेत, काही विशेष रचना केली आहे, असे आपल्याला दिसून येईल :

१. विवाहित असताना आपण एका स्त्रीच्या प्रेमात पडल्याचा

जो प्रकार नाट्यकथांमध्ये दिसून येतो त्याबद्दल नायकाची यट्टा करायला किंवा त्याच्यावर टीका करायला वाचक–प्रेक्षकांना अवसरच राहू नये अशी कालिदासाने रचना केली आहे. नाटकातील पात्रेच नायकाचा मुक्त उपहास करतात किंवा त्याच्यावर टीकास्त्र सोडतात. कालिदासाच्या नाटकात खेळकर वातावरण असले तरी त्याचे प्रेमदर्शन उथळ नसून गंभीर आहे; किंबहुना संस्कृत नाट्याचीच ही शास्त्रप्रणीत प्रवृत्ती आहे. प्रहसननाट्याचा भेद सोडल्यास, संस्कृत नाट्यातील प्रणयदर्शनात उथळपणा संभवतच नाही, हे लक्षात घेतले म्हणजे या टीकेचे कलात्मक प्रयोजन समजून येईल. अशा उपहासामुळे आणि टीकेमुळे नायकाची प्रेमनिष्ठा कशा स्वरूपाची आहे याची आपोआप कसोटी लागते.

कालिदासाच्या नायकात सर्वांत कमी प्रतीचा वाटणारा नायक म्हणजे अग्निमित्र. त्याला दोन राण्या आहेत; आणि युद्धभूमीवर शौर्य गाजवील एवढा मुलगा आहे. म्हणूनच मालविकेबद्दलचे त्याचे प्रेम म्हणजे हुरळून जाण्याचा एक प्रकार आहे असे आपल्याला वाटते. पण अग्निमित्राला धारिणी आणि इरावती जे टोमणे मारतात त्याची धार विलक्षण आहे; सत्ताधीश राजाला त्याची पत्नीही बोलायला घाबरणार नाही अशा स्पष्टवक्तेपणा आणि उपहास या शब्दांत आहे. अग्निमित्राचा मित्र विदूषक गौतम तर सर्व नाटकभर त्याची अशी रेवडी उडवितो की अग्निमित्राचा, राजा म्हणून आणि नायक म्हणून, असलेला–नसलेला सारा रुबाब भोसडून पडलेला आहे. या चित्रणात बहुपत्नीत्वाचे सारे छद्म कालिदासाने चव्हाट्यावर आणले आहे.

नायकाची विवाहित राणी आणि त्याचा मित्र विदूषक ही पात्रे प्रेमनिष्ठेच्या परीक्षेसाठी शस्त्रासारखी योजलेली कालिदासाच्या नाटकात आढळतात. विक्रमोर्वशीयातला विदूषक बावळट आहे. पण या बावळटपणामुळेच पुरूरव्याच्या उर्वशीप्रेमाचे सारे बिंग फुटते आणि

पुरूरव्याला औशीनरीच्या रागाला तोंड द्यावे लागते. मात्र हा चावट विदूषक, उर्वशीच्या सान्निध्यात, मणिहर्म्यप्रासादाच्या गच्चीवर, राजा जेव्हा अधीर होतो तेव्हा त्याला, 'इथेच रात्र झाली की काय तुमची ?' असा सणसणीत टोला मारायला चुकत नाही.

सत्तेचा आणि सामाजिक स्थानाचा स्वाभाविक मोठेपणा असलेल्या राजाला असे फजितीच्या प्रसंगामध्ये उभे करण्याने त्याच्या प्रेमप्रकरणात कुठे चोरटेपणा नाही हे स्पष्ट झाले आहे. आणि असा उपहास, अशी प्रखर टीका, राजा म्हणून एका क्षणात बंद पाडण्याचा अधिकार असताही, एक व्यक्ती म्हणून निमूटपणे आणि क्षमायाचनेच्या भावनेने तिचा स्वीकार केलेला दाखविताना हे प्रेम म्हणजे क्षणिक, उथळ विकार ( a flippant affair ) नसून ती एक अनिवार भावना आहे, असा सूर प्रकटला आहे.

राजा आणि नायक म्हणून दुष्यन्ताचा जो गौरव आहे त्याला अकारण तडे जायला नकोत म्हणून दुष्यन्ताच्या राण्यांना कालिदासाने रंगमंचावर हेतुपूर्वक आणलेले नाही. पण रचनेचा बंध अशा रीतीने बदलताना, दुष्यन्ताच्या शकुन्तलाप्रेमाची टीका आरंभीच करायला कालिदास विसरलेला नाही. शाकुन्तलातील विदूषक माढव्य हा दुष्यन्ताचा पहिला टीकाकार. दुष्यन्ताचे शकुन्तला-प्रेम म्हणजे एका तापसकन्येचा अभिलाष, हा त्याचा पहिला टोला. गोड खाऊन विटलेल्या माणसाने चिंच चाटून पाहण्याचा आवटपोक करावा, तसेच स्त्रीरत्नाचा उपभोग घेणाऱ्या दुष्यन्ताचे शकुन्तलेकडे आकृष्ट होणे आहे, हा त्याचा दुसरा प्रहार. पहिल्यात, शकुन्तला तापसकन्या म्हणजे ब्राह्मणकन्या आहे; तिच्याविषयी क्षत्रियाने अभिलाष धरण्यात प्रतिलोम विवाहाचा भाग आहे; म्हणजे राजाचे वर्तन वर्णधर्माच्या विरुद्ध जाणारे आहे, हा सूर आहे. कायद्यांची अंमलबजावणी करणाऱ्या राजाने स्वतःच कायदे मोडावे, अशा आशयाची ही टीका आहे. अर्थात विदूषकाचा हा

दोघ अनाठायी होता. शकुन्तलेच्या जन्माची हकीकत कळल्यावर ती ‘क्षत्रपरिग्रहक्षमा’ असल्याचा निर्वाळा आपोआपच मिळत आहे. प्रेमप्रकरणातही प्रचलित धर्माच्या विरुद्ध काहीही घडू नये याबद्दलची जागरूकता येथे प्रकटलेली आहे. विदूषकाच्या दुसऱ्या आक्षेपात दुष्यन्ताचे प्रेम हे रुचिपालट असल्यामुळे, म्हणजे त्यात शाश्वत निष्ठा नसल्यामुळे आहे असे सुचित आहे. याला उत्तर देताना दुष्यन्त शकुन्तलेच्या अनुपम लावण्याचे चित्र उभे करतो. त्यातील व्यंग्यार्थ असा की शकुन्तलेसारखी अनुपम सौंदर्यवती कायमची आपली व्हावी असेच कोणालाही वाटेल; त्याच्या मनात क्षणिक अभिलाषाच जागृत होईल तो सौंदर्य ग्रहण करणारे डोळे मिटून आला आहे, असेच म्हटले पाहिजे. दुष्यन्ताचे प्रेम निषिद्ध नाही, उथळही नाही, असा या प्रसंगाचा आशय आहे. विदूषकाची ही खात्री पटल्यानंतर, आणि शकुन्तलेचे मनही दुष्यन्ताकडे आकृष्ट झाले आहे याची जाणीव झाल्यावरच, ‘गृहीतपाथेयो भव’ असे उत्तेजन तो दुष्यन्ताला देतो.

२. वरील विवेचनात सूचित असलेला एक मुद्दा वेगळा मांडून स्पष्ट करण्याजोगा आहे. कालिदासाच्या काव्यनाटकांतील कुठल्याही चित्रणात धर्माच्या विरुद्ध, निषिद्ध प्रेमाचे उदाहरण नाही. कलेच्या दृष्टीने अशा सोवळेपणा करण्याची वस्तुतः काही गरज नाही. असे असूनही कालिदासाने हे पथ्य पाळले त्याचा अर्थ, आपल्या नायकाचे प्रेम-विषयक वर्तन धर्म-अविरुद्ध असावे याकडे कालिदासाचा कटाक्ष आहे, असाच केला पाहिजे. बहुपत्नीक नायकाला सांभाळण्याचा हा कलात्मक प्रयत्न आहे, हे सांगावयास नको. वर दुष्यन्ताचे उदाहरण स्पष्ट झाले आहेच. त्याच्या अनुरूपतेची ग्वाही कण्वानीच दिली आहे. अग्निमित्राच्या बाबतीतही, मालविका ही दासी नसून राजकन्या आहे,

याचा उलगडा झाल्यावरच दोघांच्या विवाहाला थोरल्या राणीची अनुमती मिळते, असे कालिदासाने दाखविले आहे. त्यातही वर्ण-धर्माच्या दृष्टीने दोघे एकमेकांना अनुरूप आहेत हीच सूचना प्रामुख्याने आहे. उर्वशी अप्सरा असली तरी स्वर्गाङ्गना आहे, हा परस्पर–योग्यतेचा दुवा विक्रमोर्वशीय नाटकात आहे.

३. याच संदर्भात आणखी एक मुद्दा असा की, कालिदासाच्या नायकांना सौंदर्यवती नायिकाबद्दल वाटलेले प्रेम भोगाच्या तृतीवर अडखळलेले नाही. त्यांना आपलेसे करून अंतःपुरात दाखल केले म्हणजे जिंकली अशी नायकाची सरंजामी भावना मुळीच नाही. नायिकाशी त्यांचा विवाह होतो एवढेच नाही, विवाह करून त्यांना मानाचे गृहिणीपद द्यावे, राणीच्या आसनावर बसवावे अशी त्यांची प्रथमपासून भावना आहे. आपल्या सत्तेचा किंवा स्त्रीच्या असहायतेचा फायदा घ्यावा अशी मनोवृत्ती या नायकांची नाही. मनाची तळमळ आणि शरीराची अधीरता कितीही उत्कट असली तरी विवाहाचा निश्चय झाल्याबाचून वर्तनाचे स्वातंत्र्य घेतल्याचे एकाही नायकाबाबत दिसणार नाही. बोलण्यात त्यांची इच्छा मुक्तपणे प्रकट झाली, आणि पुरुषी अधीरपणात त्यांचा संयम क्षणभर सुटला असे वाटले तरी कृतीला रोखून धरायला कालिदास विसरलेला नाही. हा लगाम आवश्यक तेथे कालिदासाच्या नायिका घालतात, हे शकुन्तलेच्या उदाहरणावरून स्पष्ट होईल. 'पौरव, रक्ष विनयम्। मदनसंतप्तापि न खलु आत्मनः प्रभवामि।' हे शकुन्तलेचे उद्गार अधीर दुष्यन्ताला एखाद्या फटक्यासारखे मानावर आणायला समर्थ आहेत. आणि हीच शकुन्तला, अव्याज निसर्गकन्या असूनही, स्त्रियांच्या अंगी जे अशिक्षितपटुत्व, म्हणजे जन्मजात जाणतेपण असते त्या सामर्थ्यावर दुष्यन्ताच्या हेतूची कसोटी लावते. परस्परांचे प्रेम व्यक्त झाल्यावरही

शकुन्तला म्हणते, 'सखी, अंतःपुराचा विरह बराच काळ झाल्याने राजेसाहेब घरी जायला फार उत्सुक झाले असतील. त्यांचा अकारण खोळंबा का करतेस?' आणि शकुन्तलेच्या उद्गारातील प्रहार असह्य होऊन दुष्यन्त कळवळून म्हणतो, 'मेलेल्याला पुन्हा मारानं तसं आहे हे!' राजाला अनेक प्रेयसी असणारच, त्यावर हा प्रहार आहे. शकुन्तलेचे अंत.पुरातील स्थान काय, असा हा प्रश्न आहे. दुष्यन्त या प्रसंगी आश्वासन देतो की, बहुपत्नीक असलो तरी माझ्या कुळाची प्रतिष्ठा माझे पृथ्वीचे राज्य आणि शकुन्तला या दोहोंवरच अधिष्ठित आहे. या सर्व प्रसंगात राजाच्या प्रेमनिष्ठेची जशी ग्वाही आहे, तशी विवाहाची आणि नायिकेच्या विवाहोत्तर कौटुंबिक स्थानाचीही आहे.

४. खरे म्हणजे, कालिदासाच्या नाटकात प्रणयाराधनाचे जे चित्र आहे त्याचा अर्थ खोलात जाऊन पाहणे आवश्यक आहे. नाटकाची रंगत साधावी, साहित्यकलेचा मनोरम विलास दाखवावा, एवढाच उद्देश या चित्रणात नाही. आशयाचा व्यंग्यार्थ पाहाता आपल्याला असे दिसून येईल की, स्त्रीची अनुमती, तिचा प्रेमाचा प्रतिसाद, ही प्रणयसाफल्याची एक महत्त्वाची कसोटी कालिदासाने मानलेली आहे. पुरुषप्रधान, बहुपत्नीक समाजरचनेत पुरुषाचे स्वातन्त्र्य गृहीत असताना, स्त्रीच्या प्रेमाची, तिच्या अनुकूलतेची कदर नायकाने करावी आणि तिची इच्छा निःसंदिग्ध रीतीने व्यक्त झाल्याखेरीज विवाहाचा बेत करू नये, असे जे कालिदास आपल्या नाटकामधून दाखवतो त्यात सामाजिक दृष्ट्या उपेक्षित असलेल्या स्त्रीला प्रेमाच्या राज्यात तरी न्याय मिळावा असा कलात्मक उद्देश असला पाहिजे यात शंका नाही. काव्य नाटकातील एखादुसरा अपवाद सोडल्यास, कालिदासाने परस्परप्रीतीचा पाठपुरावा केला आहे असे दिसून येते. स्वयंवरात

विशेषतः गांधर्वविवाहात स्त्रीची स्वतःची इच्छा आणि खुशी आपो-आपच प्रकट झालेली असते. नाटकांमधून प्रीतिविवाहाची चित्रणे करताना, हे प्रेमदर्शन एकांगी, एकपक्षी राहू नये, अशी दक्षता कालिदासाच्या मांडणीत आहे. नायक आणि नायिका यांना परस्पराबद्दल वाटणारे प्रेम, इतरांच्या उत्तेजन-आश्वासनावर न विसंबता, परस्परांच्या समोर स्पष्ट शब्दांत जेव्हा व्यक्त होते, तेव्हाच त्यांच्या विवाहाची पहिली पायरी सिद्ध होते. परस्पर प्रेमाभिव्यक्तीचे हे प्रसंग कालिदासाच्या नाटकांत भावनापूर्णतेने आणि काव्यमय सौंदर्याने व्यक्त झालेले आहेत मौजेची गोष्ट अशी की अग्निमित्रासारखा मिळमिळीत नायक सुद्धा प्रेमाचे मोठे तत्त्वज्ञान सांगून जातो : दोन प्रेमिकांपैकी एकाला दुसऱ्याविषयी अनिवार उत्कंठा असेल, पण दुसऱ्याला जर कोणत्याही प्रकारची आतुरता नसेल, तर अशा व्यक्तींचे वैवाहिक मीलन होऊनही त्यात आनंद वाटणार नाही. उलट, दोन व्यक्तींचे परस्परांवर समान उत्कट प्रेम असेल तर, त्यांना परस्परांची प्राप्ती न होता निराशेने मरण आले तरी ते अधिक बरे! ( मालविकाग्निमित्र, ३.१५ ). अग्निमित्राच्या प्रेमविषयक ही भावना, मग पुरूरवा, दुष्यन्त यांच्याबद्दल काय बोलावे! पुरुषाने आपली लहर, हट्ट, विकार किंवा अधिकार यांना वश न होता स्त्रीच्या प्रतिसादाची, तिच्या खुशीची वाट पाहावी व तोवर आफत्यपूर्ण मानसिक यातना सोसाव्यात यात, कळतनकळत का होईना, स्त्रीपुरुषांची विषमता सुप्त झाली आहे.

७. कालिदासाच्या चित्रणात नकळत प्रकटलेला आणखी एक विशेष म्हणजे त्याचे नायक पराक्रमी पुरुष आहेत. राजा म्हणून, सुरक्षी म्हणून, वीर म्हणून, आणि तत्कालीन समाजाचे नेते म्हणून त्यांची योग्यता निरपवाद आहे. अगदी अग्निमित्राच्या बाबतीतसुद्धा हे खरे

मानले पाहिजे. वरवर पाहाता, अग्निमित्राचा तुच्छा लढाईवर जातो आणि तो स्वतः प्रमदवनात प्रणयाराधन करीत बसतो असे दृश्य दिसते आणि त्यामुळे अग्निमित्र आपल्या मनातून उतरला तरी, तत्कालीन सदर्भात या घटनेचा अर्थ असा होत नाही. अग्निमित्राच्या राजनीतीच्या ज्ञानाची आणि मुत्सद्देगिरीची कल्पना कालिदासाने आरंभीच दिलेली आहे. राजनीतीच्या दृष्टीने, प्रत्येक लढाईवर सेनाप्रमुखच जातो असे नाही, हे आजच्या सदर्भातही खरे आहे. तेव्हा अग्निमित्राने आपल्या मुलाला युद्धावर पाठविले याचा अर्थ, शाकुन्तलात दुष्यन्त इन्द्राविषयी म्हणतो (७४) त्याप्रमाणे, वडिलांना योग्य अवसर देण्याचा प्रकार आहे, असाच करणे प्राप्त आहे. पुरूरवा आणि दुष्यन्त, किंवा रघुवंशातले राजे यांच्या पराक्रमाबद्दल प्रश्न नाही. तेव्हा, हे प्रणयदर्शन म्हणजे वीराचा शृंगार आहे; आयुष्यात नायकाच्या मागे लागण्याशिवाय त्यांनी दुसरे काहीच कर्तृत्व केले नाही, अशाचा प्रणय नव्हे. हा एक सूर येथे उमटलेला आहे.

६. बहुपत्नीत्वाच्या वातावरणात नायकाच्या नव्या प्रेमनिष्ठेची कसोटी लागली तरी त्याच्या विवाहित राणींचे काय, असा एक प्रश्न अपरिहार्य आहेच. कोणत्याही स्त्रीला आपल्या पतीचे प्रेम सवतीला व्हावे आणि आपल्या प्रेमावर सवतीने यावी हे रुचणार नाही. मात्र तत्कालीन परिस्थितीत या गोष्टीला उपाय नव्हता. म्हणून कालिदासाने समंजस वृत्तीचा उपदेश केला आहे आणि तो, 'कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने' अशा शब्दात कण्वाच्या मुखाने दर्शविला आहे. अनुभवी राण्या ही अगतिकता आपल्या भाव राखून स्वीकारतात असे धारिणी, औशीनरी, वसुमती यांच्या उदाहरणावरून दिसते. अननुभवी आणि वयाने कमी असलेल्या तरुण राण्या जळफळाट करतात हे इरावती, हंसपदिका यांच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष वर्णनात दिसते. अर्थात् या

परिस्थितीला तोंडगा नसल्याने कौटुंबिक जीवनाचा आनंद गद्वळ करण्यापेक्षा, तडजोड करून इतराच्याबरोबर आलेले सुख साधावे अशी व्यावहारिक दृष्टी कालिदासाची आहे. मात्र यात, पुरुषाच्या वर्तनाची एक विशेष ग्वाही प्रकट करून, विवाहित स्त्रीची मानहानी करी होणार नाही असे चित्रण कालिदासाने केले आहे. घेतले पाहिजे.

कालिदासाने हे दोन प्रकारे साधले आहे. ५ नैतिक मूल्याचा आणि नेत्यांचा कमाल आदर एका स्त्रीच्या प्रेमात हे नायक पडतात ते अनिवार म्हणून. पण असे प्रेम करीत स्त्रीच्या मागे, फावल्या वेळात, धावावे वर्तनात नाही. इतर स्त्रियांच्याबद्दल, निरतिशय आदराची भावना या असते. आपल्या दरबारी आलेल्या दृष्टी या संदर्भात पाहण्यासारखी आहे. तो तिला परस्त्री समजतो. तिचे रूप प्रतिहारी जेव्हा लघळपणे बोलू लागते 'भवतु। अनिर्वर्णनीयं परकलत्रम् नाम।' याची खात्री न पटल्यामुळे, नैतिक करण्याचे दुष्यन्त नाकारतो; तेव्हा या लागते : 'अहो केवढा हा असता तर अशी सुंदर बाई पाहिल्यावर परस्त्रीबद्दलचा हा नितान्त आदर हे, बलस्थान आहे. हे एक भारतीय परम - जाणतोच.

विक्रमोर्वशीय नाटकात असाच एक प्रसंग आहे. उर्वशी आणि पुरूरवा गन्धमादनवनात विहारासाठी गले असता, पुरूरव्याची दृष्टी उदयवती नामक एका विद्याधरदारिकेकडे जाते; आणि उर्वशी रागावून निघून जाते. या प्रसंगावर भाष्य करताना, मला एकही टीकाकार आढळला नाही की ज्याने या प्रसंगातून पुरूरव्याचा चचलपणा आणि त्याची लोलुपता दाखवून त्याला दोषी धरले नाही. उलट, उर्वशीसारखी स्वर्गीय सुंदरी जवळ असताना पुरूरव्याला दुसऱ्या स्त्रीकडे रूप वेळ निरखन पाहात बसण्याचा मोह टाळता येऊ नये, यापेक्षा हीनता ती काय, असाच अभिप्राय एकमुखीने व्यक्त झाला आहे. असे हीन पुरुष जगात असू शकतील. कालिदासाचा असा अभिप्राय आहे की काय, हा आणि एवढाच प्रश्न येथे महत्त्वाचा आहे. आणि कालिदासाचे या प्रसंगाचे चित्रण पाहाता, त्याचे शब्द प्रयोग आणि त्यातील व्यंग्यार्थ, गूढ नसूनही, निहाळण्याची साधी वाङ्मयीन जबाबदारी कोणी पाळली नाही, असे म्हटल्यावाचून गत्यंतर नाही. उदयवतीला कालिदासाने विद्याधरदारिका म्हटले आहे. 'दारिका' शब्दाला काही अर्थ आहे ना? ही वयाने मोठी, समज असलेली स्त्री असती तर विद्याधर स्त्री, विद्याधरी, असा शब्दप्रयोग कालिदासाला करता आला नसता? उदयवती ही 'बाई' नाही, एक लहान मुलगी आहे, हे कालिदास सुचवीत आहे. आणि मंदाकिनीच्या तीरावर वाळूचे किल्ले (किल्ला, 'सिकतापर्वत') रचून ती खेळण्यात मग्न झाली होती, या वर्णनावरून तर हे स्पष्टच आहे. म्हणजे, पुरूरवा एखाद्या बाईकडे पाहात नव्हता, आपल्याच खेळात स्वतःला हरवून गेलेल्या एका गोंडस बालिकेकडे पाहात होता. असे मूल कोणाचे लक्ष वेधणार नाही? त्यातून पुरूरवा अद्यापि निपुत्रिक आहे याचीही आठवण कायम असावी. एवढ्याने उर्वशीने चिडायचे काहीच कारण नव्हते. पण, सहजऱ्या सांगते त्याप्रमाणे, उर्वशी

परिस्थितीला तोडगा नसल्याने कौटुंबिक जीवनाचा आनंद गढूळ करण्यापेक्षा, तडजोड करून इतराच्याबरोबर आपले सुख साधावे अशी व्यावहारिक दृष्टी कालिदासाची आहे. मात्र यात, पुरुषाच्या वर्तनाची एक विशेष ग्वाही प्रकट करून, विवाहित स्त्रीची मानहानी कधी होणार नाही असे चित्रण कालिदासाने केले आहे, हे ध्यानी घेतले पाहिजे.

कालिदासाने हे दोन प्रकारे साधले आहे. एक, नायकाच्या अंगी नैतिक मूल्याचा आणि नेकीचा कमाल आदर आहे असे दाखवून. एका स्त्रीच्या प्रेमात हे नायक पडतात ते प्रेमभावनेची प्रबळ ऊर्मी अनिवार म्हणून. पण असे प्रेम करीत असताना, दिसेल त्या सुंदर स्त्रीच्या मागे, फावल्या वेळात, धावावे असा आचरटपणा त्यांच्या वर्तनात नाही. इतर स्त्रियांच्याबद्दल, विशेषतः विवाहित स्त्रीबद्दल, निरतिशय आदराची भावना या नायकाच्या मनात सदैव जागृत असते. आपल्या दरबारी आलेल्या शकुन्तलेविषयीची दुष्यन्ताची दृष्टी या संदर्भात पाहाण्यासारखी आहे. शकुन्तलेला न ओळखल्याने तो तिला परस्त्री समजतो. तिचे रूप पाहून तोही चकित होतो, पण प्रतिहारी जेव्हा लघळपणे बोलू लागते तेव्हा दुष्यन्त तिला दाबतो : ‘भवतु। अनिर्वर्णनीयं परकलत्रम् नाम।’ पुढे, ही आपलीच स्त्री आहे याची खात्री न पटल्यामुळे, नैतिक दृष्टीने, शकुन्तलेचा स्वीकार करण्याचे दुष्यन्त नाकारतो, तेव्हा या प्रतिहारीलाच कबूल करावे लागते : ‘अहो केवढा हा धर्मतत्त्वाचा आदर! दुसरा एखादा असता तर अशी सुंदर बाई पाहिल्यावर विचारात पडलाच नसता!’ परस्त्रीबद्दलचा हा नितान्त आदर हे, कालिदासाच्या नायकाचे बलस्थान आहे. हे एक भारतीय परम नीतिमूल्य आहे, हेही आपण जाणतोच.

विक्रमोर्वशीय नाटकात असाच एक प्रसंग आहे. उर्वशी आणि पुरूरवा गन्धमादनवनात विहारासाठी गेले असता, पुरूरव्याची दृष्टी उदयवती नामक एका विद्याधरदारिकेकडे जाते; आणि उर्वशी रागावून निघून जाते. या प्रसंगावर भाष्य करताना, मला एकही टीकाकार आढळला नाही की त्याने या प्रसंगातून पुरूरव्याचा चंचलपणा आणि त्याची लोलुपता दाखवून त्याला दोषी धरले नाही. उलट, उर्वशीसारखी स्वर्गीय सुंदरी जवळ असताना पुरूरव्याला दुसऱ्या स्त्रीकडे क्षणभर वेळ निरखून पाहात बसण्याचा मोह टाळता येऊ नये, यापेक्षा हीनता ती काय, असाच अभिप्राय एकंदरीत व्यक्त झाला आहे. असे हीन पुरुष जगात असू शकतील. कालिदासाचा असा अभिप्राय आहे की काय, हा आणि एवढाच प्रश्न येथे महत्त्वाचा आहे. आणि कालिदासाचे या प्रसंगाचे चित्रण पाहाता, त्याचे शब्द-प्रयोग आणि त्यातील व्यंग्यार्थ, गूढ नसूनही, निहाळण्याची साधी शाळ्यपीन वशाक्षरी कोणी पाळली नाही, असे म्हटल्यावाचून गत्यंतर नाही. उदयवतीला कालिदासाने विद्याधरदारिका म्हटले आहे. 'दारिका' शब्दाला काही अर्थ आहे ना? ही वयाने मोठी, समज असलेली स्त्री असती तर विद्याधर-स्त्री, विद्याधरी, असा शब्दप्रयोग कालिदासाला करता आला नसता? उदयवती ही 'बाई' नाही, एक लहान मुलगी आहे, हे कालिदास सुचवीत आहे. आणि मंदाकिनीच्या तीरावर वाळूचे किल्ले (किंवा, 'सिकतापर्वत') रचून ती खेळण्यात मग्न झाली होती, या वर्णनावरून तर हे स्पष्टच आहे. म्हणजे, पुरूरवा एखाद्या बाईकडे पाहात नव्हता; आपल्याच खेळात स्वतःला हरवून गेलेल्या एका गोंडस बालिकेकडे पाहात होता. असे मूल कोणाचे लक्ष वेधणार नाही! त्यातून पुरूरवा अद्यापि निपुत्रिक आहे याचीही आठवण कायम असावी. एवढ्याने उर्वशीने चिडायचे काहीच कारण नव्हते. पण, सहजन्या वागते त्याप्रमाणे, उर्वशी

' असहना ' होती, स्वभावत:च तापट होती; आणि तिचे प्रेमही इतके तोलवर रुजलेले होते की, बालिकेकडे पाहाण्यातही आपल्याकडे झालेले दुर्लक्ष तिला रुचण्यासारखे नव्हते. अशा हा प्रसंग. यात पुरूरव्याचा नैतिक दोष काय ? आधळी आणि आग्रही टीकापद्धती स्वभावचित्रणाचा काय विपर्यास करू शकते, याचे हे आणखी एक उदाहरण.

नैतिक मूल्याच्या जोडीला कालिदासाने दुसरी जी गोष्ट केली ती नायकाचे आपल्या पत्नीशी वर्तन अत्यंत दाक्षिण्याचे, आदराचे, तिच्या भावनेची कदर करण्याचे असते असे दाखविले. स्त्रीवरचे मन उडून दुसऱ्या स्त्रीवर ते जडले आहे, याची एक अपराधी जाणीव या नायकाच्यामध्ये आहे. तिला हे कळून दुःख होऊ नये, या भावनेने ते आपले प्रेमप्रकरण शक्य तो गुप्त राहावे अशी धडपड करतात; उघड झाल्यास खोटे बोलून सारवासारव करण्याचा प्रयत्न करतात; आणि वेळ आली तर पत्नीला अक्षरशः साष्टांग नमस्कार घालून तिची क्षमा मागण्याचीही त्याची तयारी आहे. अग्निमित्र आणि पुरूरवा यांच्या बाबतीत हे प्रसंग घडल्याचे आपल्याला प्रत्यक्ष दिसते. दुष्यन्ताच्या चित्रणात कालिदासाने हे प्रसंग टाळले आहेत. परंतु आपल्या राण्यांना शकुन्तलेची हकीकत कळू नये असे त्यालाही मनापासून वाटते, आणि त्याप्रमाणे तो विदूषकाला सूचनाही देऊन ठेवतो. पुढे शकुन्तलेविषयीची स्मृती जागृत झाल्यानंतर विरहदुःखाने तो मनातल्या मनात होरपळत असता, अंतःपुरातील स्त्रियांशी बोलताना त्यांना संबोधण्यात दुःखव्यग्रतेमुळे त्याच्याकडून प्रमाद होतात, त्याचे दुष्यन्ताला इतके वाईट वाटते की लज्जेने तो चूर होऊन जातो. नायकाच्या या वर्तनात आधुनिक दृष्टीला नाटकीपणा दिसेल, खोटेपणा दिसेल, बायकोपुढे लोटांगण घालण्यात हास्यास्पदता

हंसपदिकेप्रमाणे शकुन्तलेचीही एक दिवस अशीच अवस्था होईल; दुष्यन्ताचे प्रेम असे स्वार्थी, शरीरनिष्ठ आहे. पुढे विरहदुःखाची आच लागून ( आणि, मागे सांगितले त्याप्रमाणे, निःस्वार्थ देवकार्य केल्यावर ) दुष्यन्ताचे प्रेम शुद्ध होते, दुष्यन्त आरपार बदलतो, आणि मग या विशुद्ध स्वर्गीय प्रेमाचे पुनर्मीलन घडून येते : अशी या गीताची आणि या प्रेमकथेची मीमांसा आहे. ही स्वर्गीय प्रेमाची मीमांसा शकुन्तलेच्या बाबतीत आपण परीक्षून पाहिली आहेच; दुष्यन्ताच्या बाबतीत ती आता पाहावयाची आहे.

येथेही प्रश्न आहे तो कालिदासाच्या अभिप्रायाचा. मागील विक्रमोर्वशीयमधल्या उदाहरणाप्रमाणे, हंसपदिकेच्या गीतातील शब्दांचा वाच्यार्थ आणि ध्वन्यर्थ नीट लावण्याची वाङ्मयीन जबाबदारी टीकाकारांनी सांभाळली नाही, कोणी तरी श्रवणसुभग अर्थ बसविला, त्यानेच सारे हुरळून गेले, असेच येथेही झाले आहे. हंसपदिकेकडे दुष्यन्ताचे आता लक्ष नाही, याबद्दल तिला दुःख होणे स्वाभाविक आहे. त्या दुःखापोटी तिने दुष्यन्ताच्या वर्तनाबद्दल तक्रार करणेही रास्त आहे. हंसपदिकेबद्दल आपल्यालाही वाईट वाटेल. पण या प्रसंगाकडे पूर्वग्रहविरहित दृष्टीने पाहाताना, हंसपदिकेची तक्रार तिच्या वैयक्तिक व्यथेमधून निर्माण झाली आहे, ती वाच्यार्थाने स्वार्थी आहे, तिच्यात स्त्रीसुलभ मत्सराची एक छटा निःसंशय आहे, याचा विसर निदान टीकाकाराला तरी पडू नये ! आणि शिवाय, दुष्यन्ताच्या स्त्रीविषयक वर्तनाची हंसपदिका ही एकमेव न्यायाधीश आहे काय ? वसुमती दुष्यन्ताबद्दल अशी तक्रार करणार आहे काय ? पण कालिदासाला एवढेच यातून सुचवायचे नाही. गीतातील प्रतीक नीट उलगडले म्हणजे चूतमंजरीचे साम्य हंसपदिकेशी आणि कमलाचे साम्य वसुमतीशी स्पष्ट होते. ' मंजरी ' आणि ' कमल ' यातील फरक ध्यानी घेतला म्हणजे दिसते की

हंसपदिका ही मुसमुसलेल्या यौवनाची भोगोत्सुक तरुणी आहे; उलट वसुमती ही जिचा विकास पूर्ण झाला आहे अशी, तुलनेने, प्रौढा आहे. चूतमंजरीचा बहर वसंताचा, तर कमल सर्वकाळचे; या फरकावरूनही तारुण्याचा वसंत आणि स्त्रीत्वाचा मध्याह्न सूचित होतोच आणि वरील व्यंग्यार्थाला पुष्टी मिळते. साहजिकच मंजरीच्या सहवासाचे सुख हे 'परिचुंबना'चे सुख आहे : उन्मादी, उचंबळून टाकणारे, देह आणि मन यांना गुंगवून ठेवणारे. उलट, कमलाच्या सहवासात मात्र 'वसति'सुखाशिवाय दुसरे सुख नाही : सहवास, सान्निध्य, जवळीक, एवढेच. स्वतः हंसपदिकाच हे सांगत आहे. मग प्रश्न असा की, रसलोलुप मधुकराप्रमाणे केवळ भोगाचा आनंदच दुष्यन्ताला हवा असेल तर त्याने यौवनाने मुसमुसलेल्या हंसपदिकेला जवळ करावे, की जिच्या सहवासात केवळ जवळीक आहे, अशा प्रौढ वसुमतीच्या महालात राहाण्याचे पसंत करावे ? दुष्यन्त इतका अरसिक नाही हे सदर मीमांसकानाही मान्य आहे ! मग दुष्यन्तात हा फरक का पडला ? हंसपदिकेला टाकून तो वसुमतीकडे का गेला ?

या प्रश्नाच्या उत्तरात दुष्यन्ताच्या तथाकथित परिवर्तनाचे सारे बीज आहे. वैयक्तिक वेदनेमधून हंसपदिका एक फार मोठे सत्य नकळत सांगत आहे. ते हे की, दुष्यन्ताने भोग नाकारून निश्चित मनाने सहवासमात्र जवळ केला आहे. टीकाकारांनी दुष्यन्तावर लादलेल्या भोगलोलुपतेला हंसपदिकेनेच स्वच्छ उत्तर देऊन टेवले आहे ! म्हणजे, दुष्यन्ताचे 'परिवर्तन' पुढील विरहयातनांमुळे झालेले नाही; त्याचे मन अगोदरच उदासीन, अंतर्मुख झाले आहे. भोगाची लालसा त्याला उरलेली नाही, समंजस मनाची आपुलकी मात्र त्याला हवी आहे. दुष्यन्तामध्ये हा फरक बराच पूर्वीपासून पडलेला आहे, याची साक्ष हंसपदिकेच्या उद्गारात जशी सूचित आहे तशी ती, 'एकदा आम्ही एकनेकीवर प्रेम करीत होतो'

( सुस्त्वकृतप्रणयोऽय जन.। ) या दुष्यन्ताच्या उद्गारातही आहे. दुष्यन्ताच्या मानसिक परिवर्तनाचे मूत्र असे अन्यत्र असल्याने प्रस्तुत शिक्षेची आणि शुद्धीकरणाची मीमांसा पूर्णतया अप्रयोजकपणाची ठरते, हे जरूर नसले तरी पुन्हा सांगितले पाहिजे.

दुष्यन्ताच्या मनात हे परिवर्तन का घडले ? केवळ भोगाकडे पाठ फिरवून समंजस परिपक्व मनाच्या अबोल शान्ततेची त्याला विलक्षण गोडी—' निर्वृति ', परमोच सुख—का वाटावी ?

निरर्थ, निष्फळ भोग सुख आणि विचारी माणसाला फार काळ अडकवून ठेवू शकत नाहीत, हा मानसशास्त्राच्या दृष्टीने या घटनेचा एक अर्थ आहे. दुष्यन्त असा विवेकी आहे असे कालिदासाचे चित्रण आहे; शकुन्तलेच्या पहिल्या भेटीच्या वेळी, तिच्या अव्हेराच्या प्रसंगी, दुष्यन्त ज्या समतोलपणे आपल्या मनाची आणि पुढे आलेल्या उलटसुलट बाजूंची छाननी करतो त्यावरून त्याच्या विवेकी आणि न्यायी मनाचा प्रत्यय यायला हवा.

पण कालिदासाने दुष्यन्ताच्या मानसचित्रणात आणखी एक रंग भरलेला आहे. दुष्यन्त अपत्यहीन आहे. कालिदासाची ही एक आवडती कल्पना आहे आणि ती त्याच्या काव्यनाटकांमधून पुन्हा पुन्हा डोकावते. रघुवंशातले दिलीप, दशरथ; विक्रमोर्वशीयातला पुरूरवा, आणि येथील दुष्यन्त हे राजे निपुत्रिक होते, असे आपल्याला दिसून येते. पुरुषी मनात अपत्यहीनतेची व्यथा अंतर्यामी दडलेली असते. स्त्रीचे मन या व्यथेने कासावीस होते. मात्र केव्हा तरी ही व्यथा उचंबळून येते आणि मग पुरुषही हादरतो, असे कालिदासाचे चित्रण आहे. दुष्यन्त अपत्यहीन आहे, याची जाणीव शेवटी योजने दूर असणाऱ्या वैतानसाचीही आहे. दुष्यन्ताची आई तर मनोमनी करीव आहे. दुष्यन्त शकुन्तलेकडे

आकृष्ट झाला तो या आशेनेच, असे मला म्हणावयाचे नाही, इतकी असभ्यता कालिदास कधी करणार नाही. पण शकुन्तलेला कुलाची 'प्रतिष्ठा' म्हणून संबोधताना, या शब्दाचा दुहेरी अर्थ ऐकणाराच्या मनात रंग चाटून गेल्याशिवाय राहात नाही. दुष्यन्ताच्या अंतर्मनाची ही वेदना आहे; ती उचंबळून येते सहाव्या अंकात, धनमित्राच्या प्रकरणी. पण त्या वेळची प्रतिक्रिया पाहिली म्हणजे ही वेदना किती खोलवर दडलेली होती याची प्रचीती येते. या विवेचनाचा अर्थ असा की, शकुन्तलेची प्रणययाचना करताना ही एक व्यथा दुष्यन्ताच्या अंतर्मनात कुठे तरी खोलवर असल्याचा, आणि ती व्यथा दूर होईल अशी एक सुप्त आशा असल्याचा संभव आहे. दुसरे असे की, हंसपदिकेपासून दूर होण्याचे कारणही या व्यथेमुळे अप्रत्यक्षपणे मिळते. या वेळी शकुन्तलेची स्मृती दुष्यन्ताच्या मनात मुळीच नाही हेही कालिदासाच्या नाट्यरचनेवरून आपल्याला माहीत आहे. एवढ्या मुद्द्यापुरते बोलावयाचे म्हटल्यास, कालिदासाचे दुष्यन्ताचे चित्रण हे 'अन्तर्हृदयमन्थन' नायकाचे चित्रण आहे. दुष्यन्ताच्या लोलुपतेला आणि त्यावर आधारलेल्या परिवर्तन सिद्धीकरणाला कालिदासाचे हे उत्तर.

८. मग प्रश्न उरतो तो विरहयातनांचा अर्थ लावण्याचा. शुद्धी करणाची शापद योजनेतून एकदा दूर सारली म्हणजे मग विरहाचा अर्थ फार सोपा होतो. कालिदासाच्या चित्रणात आणि वहुपत्नीत्वाच्या पार्श्वभूमीवर, नायकाच्या विरहयातना हे त्याच्या शाश्वत, अबाधित प्रेमाचे नायिकेला मिळालेले आश्वासन आहे. पुरुषप्रधान विषम समाजरचनेने अन्याय केलेल्या स्त्रीहृदयाला कवीच्या कल्पनेने दिलेला हा न्याय आहे. याचा अर्थ, सामाजिक क्षेत्रात

त्याला सांगते की यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही, तुमचे प्रेम स्थिर आहे, हाच त्याचा अर्थ ! प्रीतीने सुखावलेला राम आपला बाहू उशी म्हणून सीतेच्या पुढे करतो, आणि सीता त्याला बिल्गून त्याच्या बाहूवर मस्तक टेकून झोपी जाते ! प्रेमाची उत्कटता आणि स्थिरता कसोटीला लागून जाणिवेच्या कक्षा विशाल होणे हा प्रीतीचा, आणि विरहयातनाचा अर्थ आहे.

आध्यात्मिक प्रेम याचा एवढाच अर्थ अभिप्रेत असता तर वादाचे कारण उरते ना. परंतु परिवर्तनवादी भूमिकेत पहिल्या प्रेमाचा शारीरिक म्हणून धिक्कार आहे, त्याला निकृष्ट म्हटले आहे, आसक्त प्रेमिकाचे शुद्धीकरण करण्याची आवश्यकता प्रतिपादिलेली आहे.

सामान्य बुद्धीला आणि मानसशास्त्राला जे कळावे ते टीकाकाराच्या ध्यानाला दिसू नये, असे का व्हावे ? प्रीतीचे स्वरूप आणि कालिदासाचे सूचक पण बोलके प्रणयदर्शन पाहिल्यावर या परिवर्तन-वादी आणि शुद्धीकरणवादी मीमांसकांना प्रेम तर कळले नाहीच, पण कालिदासही समजला नाही, असे म्हणावे काय ?

वस्तुस्थिती अशी आहे की संस्कृत सात्त्विक साहित्यातली प्रधान-धारा ही निवृत्तीची मोक्षपर उपदेशाची आहे. ललित साहित्याने या विचाराची उपेक्षा केली नाही. पण जीवनावर निष्ठा ठेवून चारही पुरुषार्थांचा मार्ग मोकळा केला आणि प्रवृत्तीच्या मार्गाने जीवना-नदाचा झरा सतत जिवंत ठेवला.

गोएथेसारख्या तत्त्वज्ञ कलावंताला हे जाणवले आहे. शाकुन्तला-मध्ये स्वर्ग आणि पृथ्वी एकवटले आहेत असे तो म्हणतो. पृथ्वीचा अस्त नाही, की पृथ्वीचे स्वर्गात रूपान्तर नाही; स्वर्गपृथ्वीचे हे मीलन आहे, असा त्याचा स्पष्ट अभिप्राय आहे " " आणि कालिदासाही। मोटे पाडण्याचा हा उद्योग मग [illegible]

[ ५ ]

तत्कालीन समाजरचनेच्या पार्श्वभूमीवर स्त्रीपुरुष प्रेमाचे चित्रण विवाह होऊन बसले, कालिदासाच्या चित्रणाचा विपर्यास झाला, म्हणून तेवढीच एक चर्चा विस्ताराने करावीशी वाटली. वस्तुतः कालिदासाच्या प्रणयदर्शनाचा एवढाच एक विषय नाही; आणि वैवाहिक प्रेमाचेही एवढेच रूप त्याने रंगविलेले नाही.

प्रेमाची व्याप्ती जीवनाइतकी आहे आणि जीवनाची विविधता प्रेमात प्रतिबिंबित झाल्याशिवाय राहात नाही. पित्याचे वात्सल्य आणि मातेचे अपत्यप्रेम हाही प्रीतीचा एक भाग आहे; किंबहुना जीवनाचे साफल्य प्रतीतीला आणून देईल अशी ही वात्सल्याची भावना आहे. म्हणूनच अपत्यहीन नायकांची अंतर्व्यथा कालिदासाने आपल्या काव्य-नाटकामधून वर्णिली आहे. दिलीप आणि सुदक्षिणा मनोमनी अतृप्त आहेत, विह्वल आहेत. आणि रघूचा जन्म झाल्यावर त्यांच्या आनंदाला पारावार उरत नाही. दाईने बोललेले शब्द बोबड्या बोलांनी उच्चारून दाखवून, तिचे बोट धरून राजवाड्यातील दालनातून हिंडणारी, आणि शिकविल्याप्रमाणे थोरांना वाकून नमस्कार करणारी, रघूची बालमूर्ती दिलीपाचे आनंदनिधान व्हावे, आणि त्याला मांडीवर घेतल्यावर सारे शरीर अमृतरसाने न्हाऊन निघाल्यासारखे त्याला वाटावे ( रघुवंश, ३.२५-२६ ) यात नवल काय ! अपत्यसुखाला वंचित असलेल्या दुष्यन्ताला सर्वदमनास पाहून हाच अनुभव येतो. कुन्द-कळ्यांसारखे इवलेसे दात दाखविणारे अकारण बालहास्य, बोबड्या बोलांची अवीट माधुर्याची बडबड, धुळीने भरलेल्या अंगाने माता-पित्याच्या मांडीवर जाऊन बसण्याची अनावर ओढ—अपत्यसुखाचा हा आनंद जीवनाला धन्यता आणणारा आहे ( शाकुन्तल,७. १६,१७, १९ पाहा ). सर्वदमनाची बालक्रीडा पाहाण्यात दुष्यन्त जसा हरखून

त्याला सांगते की यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही, तुमचे प्रेम स्थिर आहे, हाच त्याचा अर्थ! प्रीतीने सुखावलेला राम आपला बाहू उशी म्हणून सीतेच्या पुढे करतो, आणि सीता त्याला बिलगून त्याच्या बाहूवर मस्तक टेकून झोपी जाते! प्रेमाची उत्कटता आणि स्थिरता कसोटीला लागून जाणिवेच्या कक्षा विशाल होणे हा प्रीतीचा, आणि विरहयातनाचा अर्थ आहे.

आध्यात्मिक प्रेम याचा एवढाच अर्थ अभिप्रेत असता तर वादाचे कारण उरते ना. परंतु परिवर्तनवादी भूमिकेत पहिल्या प्रेमाचा शारीरिक म्हणून धिक्कार आहे, त्याला निकृष्ट म्हटले आहे, आसक्त प्रेमिकांचे शुद्धीकरण करण्याची आवश्यकता प्रतिपादिलेली आहे.

सामान्य बुद्धीला आणि मानसशास्त्राला जे कळावे ते टीकाकारांच्या ध्यानाला दिसू नये, असे का व्हावे? प्रीतीचे स्वरूप आणि कालिदासाचे सूचक पण बोलके प्रणयदर्शन साहित्यावर या परिवर्तनवादी आणि शुद्धीकरणवादी मीमांसकांना प्रेम तर कळले नाहीच, पण कालिदासही समजला नाही, असे म्हणावे काय?

वस्तुस्थिती अशी आहे की संस्कृत तात्त्विक साहित्यातली प्रधानधारा ही निवृत्तीची मोक्षपर उपदेशाची आहे. ललित साहित्याने या विचारांची उपेक्षा केली नाही. पण जीवनावर निष्ठा ठेवून चारही पुरुषार्थांचा मार्ग मोकळा केला आणि प्रवृत्तीच्या मार्गाने जीवनानंदाचा झरा सतत जिवंत ठेवला.

गोएथेसारख्या तत्त्वज्ञ कलावंताला हे जाणवले आहे. शाकुन्तलामध्ये स्वर्ग आणि पृथ्वी एकवटले आहेत असे तो म्हणतो. पृथ्वीचा अव्हेर नाही, की पृथ्वीचे स्वर्गात रूपान्तर नाही; स्वर्गपृथ्वीचे हे मीलन आहे, असा त्याचा स्पष्ट अभिप्राय आहे. त्याला आणि कालिदासालाही खोटे पाडण्याचा हा उद्योग मग कशाला!

## [५]

तत्कालीन समाजरचनेच्या पार्श्वभूमीवर स्त्रीपुरुष-प्रेमाचे चित्रण विवाद्य होऊन बसले, कालिदासाच्या चित्रणाचा विपर्यास झाला, म्हणून तेवढीच एक चर्चा विस्ताराने करावीशी वाटली. वस्तुतः कालिदासाच्या प्रणयदर्शनाचा एवढाच एक विषय नाही; आणि वैवाहिक प्रेमाचेही एवढेच रूप त्याने रंगविलेले नाही.

प्रेमाची व्याप्ती जीवनाइतकी आहे आणि जीवनाची विविधता प्रेमात प्रतिबिंबित झाल्याशिवाय राहात नाही. पित्याचे वात्सल्य आणि मातेचे अपत्यप्रेम हाही प्रीतीचा एक भाग आहे; किंबहुना जीवनाचे साफल्य प्रतीतीला आणून देईल अशी ही वात्सल्याची भावना आहे. म्हणूनच अपत्यहीन नायकांची अंतर्व्यथा कालिदासाने आपल्या काव्य-नाटकांमधून वर्णिली आहे. दिलीप आणि सुदक्षिणा मनोमनी अतृप्त आहेत, विह्वल आहेत. आणि रघूचा जन्म झाल्यावर त्यांच्या आनंदाला पारावार उरत नाही. दाईने बोललेले शब्द बोबड्या बोलांनी उच्चारून दाखवून, तिचे बोट धरून राजवाड्यातील दालनातून हिंडणारी, आणि शिकविल्याप्रमाणे थोरांना वाकून नमस्कार करणारी, रघूची बालमूर्ती दिलीपाचे आनंदनिधान व्हावे, आणि त्याला मांडीवर घेतल्यावर सारे शरीर अमृतरसाने न्हाऊन निघाल्यासारखे त्याला वाटावे ( रघुवंश, ३.२५-२६ ) यात नवल काय ! अपत्यसुखाला वंचित असलेल्या दुष्यन्ताला सर्वदमनास पाहून हाच अनुभव येतो. कुन्द-कळ्यांसारखे इवलेसे दात दाखविणारे अकारण बाल्हास्य, बोबड्या बोलांची अवीट माधुर्याची बडबड, धुळीने भरलेल्या अंगाने माता-पित्याच्या मांडीवर जाऊन बसण्याची अनावर ओढ—अपत्यसुखाचा हा आनंद जीवनाला धन्यता आणणारा आहे ( शाकुन्तल,७. १६,१७, १९ पाहा ). सर्वदमनाची बालक्रीडा पाहाण्यात दुष्यन्त जसा हरवून

कालिदासाच्या प्रणयदर्शनाचा भाग आहे, हे आपण लक्षात ठेवले पाहिजे.

मित्रप्रेमाचे फार मोठे वर्णन कालिदासाने कुठे केलेले नसले तरी त्याच्या सूचक छटांमधून या निःस्वार्थ प्रेमाची व्याप्ती सहज कळून येते. शकुन्तलेवर जीव ओवाळून टाकणाऱ्या, प्रसंगी तिची थट्टा करणाऱ्या, पण तिला फुलासारख्या जपणाऱ्या आणि तिच्या विरहाने कासावीस होणाऱ्या प्रियंवदा व अनसूया या शकुन्तलेच्या मैत्रिणी; उर्वशीची जीवाभावाची सखी चित्रलेखा; मालविकेची पाठीराखीण बकुलावलिका—आणि निदान काही अंशाने बावळट, हास्यास्पद असूनही राजाची निरपवाद सेवा करणारा विदूषक : ही चित्रे लक्षात राहावीत. कालिदासाची मित्रप्रेमाची कल्पना एका अनपेक्षित प्रसंगाने कळून येते. मदनासाठी विलाप करणारी रती म्हणते : पुरुषाचे स्त्रीवरील प्रेम अस्थिर असू शकते; पण मित्रप्रेम अचल आहे. मदनाने रतीसाठी नाही तरी निदान वसन्ताच्या प्रेमाने तरी परत यावे ( कुमारसंभव, ४.२८ ) ! मित्रप्रीतीचे तत्त्व याहून अधिक चांगल्या शब्दांत काय सांगणार !

पण स्त्रीपुरुषप्रेम हा साहित्याचा आवडता विषय आहे. त्यात मानवी मनाची गुंतागुंत दडलेली आहे; आणि त्यात, म्हणूनच, कलेला आव्हान आहे. या प्रीतीच्या अनेक छटा कालिदासाच्या प्रणयदर्शनात आकाराला आलेल्या आहेत. मीलनाकडे नेणारे पहिले प्रेम नव्या अनुभवाची रोमांचकारिता प्रत्ययाला आणून देते. साफल्याच्या क्षणापर्यंत मन संशय, निराशा, हेवा, हुरहूर, वेदना अशा अनेक अनुभवांमधून मिरवित असते. कालिदासाच्या नाटकांत आणि कुमारसंभवातील पार्वतीच्या चित्रणात प्रीतीच्या या छटा पाहाव्यात.

मागावा क्षण आलेला आहे. त्या क्षणाची अपूर्वाई सूचित केलेली आहेच.

या प्रणयदर्शनाच्या निमित्ताने स्त्रीपुरुषाच्या प्रकृतीचे जे दर्शन होते तेही किती विविध आणि विलोभनीय आहे! रघुवंशीय राजा-मध्ये एक भव्यता आहे. दुष्यन्तात ती असूनही ती उथळता वाटते त्याच्या मनोदर्शनामुळे. दुष्यन्ताची प्रवृत्ती उथळगंभीर आहे. पुरूरव्याचा प्रणय उन्मादकारी, प्रखर भावावेगाचा आहे. पुरूरव्या-प्रमाणेच अज, दशरथ हे प्रणयासक्त वृत्तीचे प्रतीक आहेत. अशी अतोल उत्कटता अजाच्या स्वभावातही आहे; म्हणूनच तो आत्म-हत्येला प्रवृत्त झाला. अग्निमित्र हा सामान्य अधीरता आणि हुरहूर यांचे चित्र आहे.

कालिदासाच्या नायिकांची भिन्नप्रवृत्ती अशीच कळून येण्यासारखी आहे. मालविका ही भाबडी, मुग्ध, बालिका आहे; प्रेम करावे, मनापासून करावे, एवढेच तिला कळते. शकुन्तलेच्या अंगी अशी अव्याजमनोहरता असूनही निसर्ग तिचा गुरु झालेला आहे, त्यामुळे तिला अभिज्ञानत्व आले आहे, निर्भयता आली आहे, आणि विलक्षण सोशिकपणाही लाभला आहे. सीता तर पृथिवीकन्या. पृथ्वीचे औदार्य आणि सर्वसहत्व तिला वारसा म्हणूनच लाभलेले आहे. इन्दुमतीची चोखंदळ जीवनदृष्टी तिने अजाची निवड करण्यातच प्रकट झाली आहे. उमेच्या जीवनात प्रणयाचे सामर्थ्य आकाराला आले आहे. उर्वशी मात्र उत्कट, आसक्त, प्रमाथी प्रणयाची मूर्ती आहे. स्वर्गाचे आणि देवतांचे नियम विसरून जाण्याइतकी ती स्वतःला हरवून बसते आणि अनावर ओढीने, आतुर होऊन, पुरूरव्याकडे धाव घेते. उर्वशीचा हा प्रमाथी प्रणय रतीमध्येही असावा; एरव्ही स्वतःला मदनाच्या चितेवर झोकून घ्यायला ती प्रवृत्त झाली नसती.

कालिदासाचे हे प्रणयदर्शन पाहिले म्हणजे म्हणावेसे वाटते की या दर्शनात अंतःपुरातील हेवेदावे, आरोप-प्रत्यारोप असले तरी कौटुंबिक जीवनाची आणि दांपत्यप्रेमाची स्निग्धता पण आहे; त्यात अलकानगरीची स्वप्निल रम्यता आहे; हिमालयाची भव्यता आणि पवित्रता आहे; येथे आश्रमाची निरामय पण निर्भय शान्ती आहे; आणि स्वर्गधरेच्या मीलनामधला उन्मादकारी आवेग आणि त्या आवेगानंतर सजणारी निर्वृति आहे.

[ ६ ]

कालिदासाच्या प्रणयदर्शनाचा परम अर्थ आता आपल्या हाती लागावा, असे वाटते.

प्रीतीची विविध रूपे कालिदासाला निःसंशय माहीत आहेत. या प्रीतीत स्त्री-पुरुषाच्या प्रेमाला अबाधित स्थान आहे, महत्त्वाचे स्थान आहे, असेच कालिदासाचे चित्रण दर्शविते. म्हणूनच स्त्री पुरुष-प्रेमाला कालिदासाने हीन, निकृष्ट, तुच्छ असे कधीच गणलेले नाही. या प्रेमाची व्याप्ती मानवी जीवनापुरती मर्यादित राखित नाही. सर्व निसर्ग आणि जीवसृष्टी प्रीतीच्या या धाग्याने बांधलेली आहे. कालिदास निसर्ग आणि मानव यांचे भावसाम्य किंवा भावना साहचर्य येथवळ दाखवून थांबत नाही. त्याच्या कलासृष्टीत लता-पादप, हरिण-हरिणी, भ्रमर भ्रमरी, हंस-हंसी, नदी-सागर, नदी मेघ, मेघ विद्युल्लता ही मानवी पति-पत्नीप्रमाणेच एकमेकांवर आसक्तीने प्रेम करणारी मिथुने आहेत, प्रणयात्मक जोडपी आहेत. कालिदासाने निर्मिलेल्या पात्रांना ही जाणीव आहे. म्हणूनच मेघाचा विशेषातून वियोग होऊ

पुरूरव्याला निसर्गभर प्रणयाकुल जोडपी दिसतात; आणि शकुन्तला आपल्या वनज्योत्स्नेचे सहकारतरूशी लग्न लावून देते.

निसर्गही यौवनात येतो; वयात येणाऱ्या मुलीची शारीरिक बदलनी चिन्हे मधुश्रीमध्ये दृग्गोचर होतात ( विक्रमोर्वशीय, २.७ ); माधवी-श्री एखाद्या युवतीप्रमाणे न्हाते ( मालविकाग्निमित्र, ३.५ ); आणि वाऱ्यालाही लतांच्याबरोबर प्रणयक्रीडा करावीशी वाटते, कारण वायूही अंजनेच्या प्रेमात एकदा सापडला होता ( विक्रमोर्वशीय, २.४; २.११ ).

या प्रीतिभावनेची लागणी पशुपक्ष्यांनाही झाल्यावाचून कशी राहील ! हरिणी आपला खाजणारा डोळा काळविटाच्या शिंगावर विश्वस्त मनाने खाजविते ( शाकुन्तल, ६.१७ ), आणि काळवीट तिला आपल्या शिंगाने खाजवीत असता स्पर्शसुखाच्या आनंदाने ती डोळे मिटून घेते ( कुमारसंभव, ३.३६ ). रसपानासाठी एकाच फुलावर भ्रमराचे जोडपे आरूढ झाले असता मधुकरीने फुलाला तोंड लावून घुटका घेतला म्हणजेच मग मधुकर, प्रेमळ स्त्री दाक्षिण्याच्या भावनेने, ( Ladies first ! ) तिच्यामागून आपले रसपान सुरू करतो ( कुमारसंभव, ३.३६ ); तर दुसऱ्या प्रसंगी, तहानलेली असूनही, मधुकरी फुलाला तोंड लावीत नाही; अनुरक्त पत्नीप्रमाणे मधुकराची वाट पाहात ती तिष्ठत राहाते ( शाकुन्तल, ६.१९ ).

कालिदासाच्या या चित्रणात नुसता काव्यविलास नाही. त्याच्या शब्दामधील ध्वन्यर्थात प्रीतीचे तत्त्वज्ञान रसरसून आलेले आहे. प्रकृति-पुरुषाची प्रीती हा निसर्गाचा धर्म आहे, सृजनाची– जीवनाची ती प्रेरणा आहे. म्हणूनच मानवासहित सारी सृष्टी या भावनेत गुरफटून जाते. रती हा जीवनाचा स्थायी भाव आहे. संभोग हा निसर्गाचाच विलास आहे; आणि सृजनाच्या, सातत्याच्या दृष्टीने

कर्तव्यही. 'कुमारसंभव' हे या विलासाचे फल, आणि जीवनाचा नवा अंकुर. म्हणूनच कालिदासाचा शिव 'कुठल्या तरी' कारणासाठी आरंभलेली कैलासावरची एकान्त-तपश्चर्या सोडून उमेपुढे येऊन उभा राहातो आणि 'अद्य तवास्मि दासः' असे प्रीतीचे आश्वासन तिला देतो. स्त्रीपुरुष प्रीतीचा हा व्यापक आणि खोल अर्थ पाहिल्यावर, या भावनेला, किंबहुना विकारालाही, हीन लेखून त्याची शुद्धी करण्याचा खटाटोप (वाङ्मयीनही) किती वेडेपणाचा म्हटला पाहिजे!

स्त्रीपुरुषाची प्रीती केवळ शारीरिक सुखाची पूर्ती नाही. सुखा-बरोबर सामर्थ्य देणारी ती ऊर्मी आहे. सर्व जीवन व्यापून टाकणारी, तळापासून ढवळून टाकणारी, जीवनाची खोली आणि उंची प्रत्ययाला आणून देणारी, प्रणयाखेरीज दुसरी भावना नाही. हा प्रणयच स्त्रीला पुरुषाच्या बरोबरीला आणतो, पुरुषाहून मोठे करतो; हा प्रणयच तिला पृथ्वीचे औदार्य बहाल करून सर्वसहा बनवितो. आणि हा प्रणयच पुरुषाच्या पराक्रमाची प्रेरणा बनतो. स्वयंवरानंतर इन्दुमतीला घेऊन अज परततो; निराश झालेले इतर राजे एकवटून त्याच्यावर हल्ला करतात; त्यांना पराभूत करून संमोहन अस्त्राने निद्रिस्त केल्यावर, ज्या अभिमानाने हे दृश्य अज इन्दुमतीला दाखवितो त्यात त्याच्या पराक्रमाची, आणि इन्दुमतीलाही जो आनंद आणि गौरव वाटला असेल त्याची, साक्ष आहे. प्रीती ही स्वार्थातून परार्थाकडे, द्वैतातून अद्वैताकडे नेणारी शक्ती आहे. भारतीय मंदिराच्या दर्शनी भागावर स्त्रीपुरुषांच्या संभोगाची शिल्पे कोरलेली आहेत. याचे आश्चर्य किंवा धक्का जीवनाचा निरास करणाऱ्या तात्त्विकांना किंवा अनभिज्ञांना वाटो. त्यातील रूपात्मक अर्थ स्पष्ट आहे. प्रीती ही स्वतःला हरवून टाकणारी किमया आहे. दुजेपणाचा भाव रतीने हरवतो. आणि भक्ती म्हणजे दुजे काय? 'रतिर्देवादिविषया' असे शास्त्र

लागतात. म्हणून रती आणि भक्ती यांत कलात्मक विरोध नाही. दोहोंचा आनंद देहभान हरविणारा आहे.

कालिदासाच्या प्रणयदर्शनाचा हा परम अर्थ होय असे त्याच्या साहित्यावरून दिसून येते. अर्थात प्रीतीचा उत्कटपणा, केव्हाही दाखवूनही कालिदासाने अतिरेकाचा मार्ग अवलंबिलेला नाही. अपत्य हे स्त्री-पुरुषप्रीतीचे फल. मातापित्यांची प्रीती विभक्त करून टाकणारे, पण विभक्त करूनही परस्परांचे प्रेम वाढविणारे ( रघुवंश, ३·२४ ). अपत्य ही कौटुंबिक जीवनाची कृतार्थता. आत्मकामातून वात्सल्य फुलले नाही तर जीवनाला पूर्णता येणार नाही, अशी कालिदासाची धारणा आहे. जीवनाचा समतोल उपभोग हा त्याच्या तात्त्विक निष्ठेचा पाया आहे. आणि धर्म उपभोगप्रधान यौवनालाही स्थान आहेच. श्रीकृष्णांनी गीतेमध्ये 'धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ।' ( ७.११ ), 'प्रजनश्चास्मि कन्दर्पः' ( १०.२८ ) असे आपल्या दिव्य विभूतींचे वर्णन केले आहे. कालिदासाचे प्रीतिविषयक तत्त्वज्ञान या निष्ठेवर उभे आहे.

कण्वासारखा गुरुजननिरत व निर्लोभी, आणि शार्ङ्गरवासारखा सार्वभौम राजालाही स्पष्टपणे आपले मत ऐकवील इतका निर्भय विद्यार्थी कालिदासाने रंगविला, गृहस्थजीवनाचे चित्र त्यातील पत्नीप्रेम आणि अपत्यस्नेह यांच्या उत्कटतेसह रेखाटले, आणि तितक्याच उत्कटतेने स्वर्गीय सुखालाही तुच्छ लेखणारे तापसाचे तपस्यानिरत जीवन दाखविले. स्वतः मोक्षाची साधना केली तीही प्रामाणिकपणे, जीवनाच्या कृतार्थतेचा क्षण आला तेव्हा. जीवनाच्या सर्व अवस्थांचा उत्कट अनुभव आणि आनंद हे कालिदासाच्या साहित्याचे रूप आहे.

या भूमिकेत जीवनाचा आणि प्रीतीसारख्या जीवनातील प्रेरणांचा अव्हेर नाही, निषेध नाही. जे आहे ते : समतोलपणे पण परिपूर्णतेने

जीवनाच्या उपभोग घेण्याची आनंदी प्रवृत्ती. जीवनातील अनुभवाचा अव्हेर करणारे तत्त्वचिंतक वरिष्ठ मूल्याची तत्त्वज्ञाने बनवू शकतील पण हसतमुखाने जीवनाचा आनंद दोन्ही हातांनी स्वीकारणारा कलावंतच कलेची निर्मिती करू शकेल, आणि त्या कलेतूनच परमार्थही फुलवू शकेल !

# सूची

## लेखकाचे कालिदासविषयक

## प्रकाशित साहित्य :

1. Treatment of the Supernatural in S'akuntala.
2. The Song of Hamsapadika.
3. The Repudiation of S'akuntala and Dubsanta's Dilemma.
   [ Journal of the Oriental Institute, Baroda;
   Vol. II, No 1, 1952,
   Vol. VII, Nos 1. 2, Sept. Dec 1957,
   Vol. IX, No 3, March 1960. ]
4. The Vidusaka
   [ The New Order Book Co , Ahmedabad, 1959 ]

५. विदूषक.

६. वेड्गावचे शहाणे.
   [ महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; १९५९.
   'कालिदासाचे तीन विदूषक.' ]

७. पाच संस्कृत नाटके
   [ मॉडर्न बुक डेपो, पुणे; १९६०.
   'शाकुन्तल', पाने ५९–९२ ]

८. विदूषकाचा विनोद
   [ 'अमृत', जानेवारी १९५९; पाने १२०–१३१ ]

९. विक्रमोर्वशीय
[ ' अमृत ', दीपावली अंक, नोव्हेंबर १९६०.
पाने २६–५२ ]

१०. कालिदासाचे पहिले नाटक
[ ' सत्यकथा ', मार्च १९६२ ]

११. मालविकाग्निमित्र
[ संपादित आवृत्ती, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, १९६२.
प्रस्तावना व मराठी अनुवाद. ]

१२. संस्कृत नाट्यसृष्टी
[ कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे, १९६४.
पाडिलकर स्मारक व्याख्यानमालेतील व्याख्याने. ]

१३. रघुवंश
[ ' अमृत ', दीपावली अंक, १९६६
पाने ५९–९३. ]

○ ○ ○